


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत मराठी अभ्यास परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या भाषा आणि जीवन ह्या नियतकालिकाच्या (त्रैमासिक) अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून मराठी अभ्यास परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका









# । दिलीप पुरुषोत्तम चित्रे ।

## हातचा

मेघगर्जनेत
पाऊस असा शब्द नसतो
विजेच्या लखलखाटात
ओलाव्याचा उल्लेख नसतो
वादळाच्या आकाराला
महापुराची तळटीप नसते

हातचा आलेला एक
कवितेच्या संहितेत नसतो
आणि हात उघडून पहावा तर
आपल्या हातीही नसतो

**मराठी अभ्यास परिषद पत्रिका**

**भाषा आणि जीवन**

**। वर्ष १५ : अंक ४ । दिवाळी १९९७ ।**










**अनुक्रम**

☐ संपादकीय / लिहायचं तरी कशासाठी ? / अशोक रा. केळकर / १
☐ रूपक आणि रूपितांग : अर्थांतरणाची प्रक्रिया / शैलेश सदाशिव पुंडलिक / ५
☐ जाता-जाता / सूत्रसंचालन-एक टाळणे / भारती पांडे / २५
☐ पुनर्भेट / भाषा हाच प्रगतीचा पाया / दत्तो वामन पोतदार / २९
☐ मधाच्या घागरीच्या निमित्ताने / लीला अर्जुनवाडकर / ३५
☐ दखलपात्र / धर्मजीवन आणि मातृभाषा / लक्ष्मण लोंढे / ४१
☐ वाढता वाढता वाढे... ! / नीलिमा गुंडी /४४
☐ अर्थायन / गनिमी कावा - काही समज व गैरसमज / का. ग. पित्रे / ४६
☐ साद आणि प्रतिसाद / १. राजमा कंगाल आणि गुलबकावली / गौरी देशपांडे / ५१
२. राजमा म्हणजे श्रावण घेवडा / ५२
३. वृत्तांच्या गणिती शक्यता / मनोहर राईलकर / ५२
४. प्रतिक्रियेवरची प्रतिक्रिया / नीती बडवे / ५७
५. नाविक हाल (एक प्रतिसाद) / मनोहर राईलकर / ५९
☐ ग्रंथ परीक्षण / शास्त्रीय लेखनातील शैथिल्य / परीक्षण लेखक - माधव ना. आचार्य / परीक्षित ग्रंथ - मराठीचे व्याकरण, लेखक लीला गोविलकर, मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे ३०, १९९३, मूल्य १०० रुपये / ६१
☐ पत्रिकासूची / वर्ष १५, १९९७ ची लेखनसूची / ७४
☐ सूचनाफलक / मराठी अभ्यास परिषद आणि 'भाषा आणि जीवन' पत्रिका : एक स्थित्यंतर / ८२
☐ मुखपृष्ठ - श्री. श्याम देशपांडे

---

☐ प्रकाशन : त्रैमासिक (जानेवारी, एप्रिल, जुलै, ऑक्टोबर)
☐ संपादन समिती : कल्याण काळे (प्रमुख), अशोक रा. केळकर, अंजली सोमण, द. दि. पुंडे, प्र. ना. परांजपे, मॅक्सीन बर्न्सन, विजया देव, आशा मुंडले, मृणालिनी शहा, गं. ना. जोगळेकर.
☐ संपादकीय संपर्क व परीक्षणार्थ पुस्तक : कल्याण काळे, मराठी विभाग, पुणे विद्यापीठ, पुणे ४११ ००७, दूरध्वनी ५४५६०३
☐ व्यवस्थापकीय संपर्क व पैशाचा भरणा : मृणालिनी शहा, १ शीतल अपार्टमेंट्स, ४६/४ एरंडवणे, पुणे ४११ ००४, दूरध्वनी ३३३८६९
☐ पत्रिकेची वर्गणी, परिषदेची वर्गणी, जाहिरातीचे दर : आवरणपृष्ठ तीन पहा.
☐ सूचना : पत्रिकेत प्रसिद्ध होणाऱ्या लेखांच्या लेखकांच्या मतांशी संपादक किंवा परिषद सहमत असतीलच असे नाही.
☐ या अंकाच्या प्रकाशनासाठी महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाचे अंशत: अनुदान मिळालेले आहे. तथापि या नियतकालिकातील लेखकांच्या विचारांशी मंडळ व राज्यशासन सहमत असतीलच असे नाही.
☐ संपादक : कल्याण काळे, प्रकाशक व मुद्रक : मराठी अभ्यास परिषदेसाठी, मृणालिनी शहा.
☐ मुद्रक : श्री वेदविद्या मुद्रणालय, ४१ बुधवार पेठ, जोगेश्वरी बोळ, पुणे ४११ ००२.

# लिहायचं तरी कशासाठी ?

लक्ष्मण माने चक्क **उपरा** (१९८०) हे पुस्तक लिहून सोडल्यानंतर 'या मुक्कामावरून' म्हणतात : "माझी टिंगल करण्यासाठी जरी कुणी म्हणालं असतं की तू पुस्तक लिही तरी मीच त्याची टिंगल केली असती..." माने ज्यांना मानत असत अशा काहींना प्रसंगाप्रसंगानं त्यांनी आपल्या आयुष्यातले काही प्रसंग सांगितले, नंतर तर जे भोगलं, सोसलं ते सारं काही सांगितलं. या श्रोते मंडळींच्या आग्रहामुळं माने लिहिले झाले हे सुदैव! **भाषा आणि जीवनसाठी** लेखन मिळवताना हा वारंवार येणारा अनुभव आहे. 'असं म्हणता ? हे जे माझ्याजवळ सांगण्यासारखं आहे त्याला वाचक मिळतील?' अशाही प्रश्नाला आम्हांला नेहमी तोंड द्यावं लागलं आहे. नंतर पत्रिकेसाठी आणखी काही लिहिल्यानंतर काहींनी मोकळेपणानं कबूलही केलं आहे की 'तुम्हा मंडळींच्या तगाद्याशिवाय आम्ही काही लिहिलं नसतं !' मराठी पुस्तकांच्या प्रस्तावनांमधून अशा प्रकारचं वाक्य नेहमी येत असतं.

याला एकदोन अपवाद आहेत. साक्षरता प्रसार वाढल्यापासून मराठीत अधिक मंडळी लिहू लागतील अशी अपेक्षा होती. ती लहान कवितांच्या बाबतीत खरी ठरली, कविसंमेलनांमधून होणारी संयोजकांची गोची आणि कवितासंग्रहांचं 'गवता ऐसे उदंड पीक' याची साक्ष देतच आहेत. दुसरं पीक कथा-कथासंग्रह आणि कादंबऱ्या म्हणजे कथन-गद्याचं. पण वाङ्मयाच्या इतर दालनात असा अनुभव येत नाही. उदाहरणार्थ प्रामाणिक अनुवाद फार थोडे. (स्वैर अनुवाद, मोकाट अनुवाद, रूपांतरं त्यामानानं अधिक.) चांगली परीक्षणं मिळवणं किती कठीण असतं हे कुणीही संपादक सांगेल. वैचारिक लेखनाची तशी रडच आहे. वैचारिक लेखनाच्याही विविध पातळ्या आहेत, विविध प्रकारही आहेत. सैद्धांतिक पातळीवरचे म्हणा, मोठा कालपट किंवा प्रादेशिक पट रेखणारे म्हणा, वैचारिक लेखन थोडंच असणार हे उघड आहे, पण अशा लेखनासाठी अनुवादक ? ते मात्र मिळत

नाहीत. १९८० साली **उपराच्या** प्रकारची आत्मकथनं फारच थोडी लिहिली जात होती, नंतर विपुल जरी नाही तरी पुष्कळच लिहिली गेली. पण आत्मकथनं करायची ती सत्तावंचित पण सत्तांकाक्षी गटातील व्यक्तींनीच करायची - दलित, आदिवासी, भटके-विभुक्त, शेतमजूर, स्त्रिया अशी एक समजूत मध्यंतरी प्रसृत झाली. पण विविध प्रकारचे सामाजिक व राजकीय कार्यकर्ते, व्यावसायिक वा व्यासंगी यांची किंवा अशाच इतरांचीही आत्मकथनं रोचक होऊ शकतील. (मुंबई मराठी साहित्य संघाच्या पुढाकाराने लिहिलं गेलेलं **एका पिढीचं आत्मकथन** या संदर्भात आठवावं.) समग्र आत्मचरित्रांपेक्षा अशी आंशिक आत्मकथनं पुष्कळदा अधिक सच्चा सूर लावतात, विचारांना अधिक चालना देणारी ठरतात. पण ज्यांच्या विचारांना आधीच चालना मिळालेली आहे अशांचं काय ? प्रथितयश विचारवंतानं त्याच त्याच विचारांचा रतीब घालत रहावं अशी वाचकांची अपेक्षा असते; कधी ते विचारवंतही दुर्दैवानं या अपेक्षेला मान तुकवतात. त्यापेक्षा 'इतरेजनां'पैकी एखाद्याला एखादा लहानसाच पण अस्सल विचार सुचला असेल तर तो ऐकणं, तो संकोचून गप्प बसला असेल तर त्यात प्रथम बोलता आणि नंतर लिहिता करणं अधिक लाभदायक नाही का ? (असं कुणीकुणी लक्ष्मण मान्यांना बोलतं-लिहितं केलं म्हणून तर आपल्याला उपरा पुस्तक लाभलं ना ?)

आपल्याला लाभलं म्हणजे आपण वाचकांना लाभलं. केवळ लिहिण्याचा आनंद, लिहिण्याची आंतरिक गरज एवढ्यामुळं लिहिती होणारी मंडळी थोडी. पुष्कळांना वाचक मिळावा अशी अपेक्षा असते. वाचक मिळण्याची आशा नसली तर अशी मंडळी गप्प राहणं पसंत करतात. आणि इथं चांगल्या संपादकांचा अवतार होतो. त्याचं अवतारकार्यच नवीन वाचकवर्ग हेरणं, त्याच्या अपेक्षा हेरणं आणि त्याची नवीन लेखकवर्गाची गाठ घालून देणं हे असतं. (माणूसकार माजगावकर अशा संपादकांपैकी होते.) पण बरेच संपादक मागणी तसा पुरवठा करणारे कंत्राटदारच राहणं पसंत करतात. (तिसरा एक पोस्टमन संपादकांचाही एक वर्ग असतो. त्यांच्यापेक्षा हे कंत्राटदार-संपादक एक पाऊल पुढं असतात एवढंच ! पोस्टमन-संपादक आपले दुकान थाटून बसतात. जे त्यांच्याकडे येईल ते मुद्रकाकडे रवाना करतात.)

म्हणजे वाचकाला ज्याप्रमाणे लेखक लाभावा लागतो. त्याप्रमाणे लेखकाला वाचक लाभावा लागतो. 'लिहायचं कशासाठी ?' या प्रश्नाच्या पोटात 'लिहायचं ते कुणासाठी ?' हा प्रश्नही दडलेला असतो. जर समाजात वाचनाचाच कंटाळा असेल तर लेखकांना लेखनाचा कंटाळा वाटणं स्वाभाविक आहे. दृश्य-श्रव्य-माध्यमाच्या या काळात वाचनाचा कंटाळा वाढत आहे असं पुष्कळांचं

निरीक्षण आहे आणि त्यात काही तथ्यही आहे. पण महाराष्ट्रापुरतं पहायचं तर याच्याशी संलग्न असे आणखीही काही मुद्दे आहेत. पहिला मुद्दा असा आहे की हा केवळ लेखन-वाचन किंवा भाषण-श्रवण यातली निवड करण्याचा प्रश्न नाही. वाचनाचा कंटाळा करणारे लोक भाषणाला गर्दी करतात का किंवा दूरवाणी वा दूरचित्रवाणीवरची भाषणं ऐकतात का याचाही शोध घ्यायला पाहिजे. **भाषा आणि जीवनच्या** पावसाळा आणि हिवाळा १९८६ अंकांतून अंजली सोमणांनी तसा शोध अंशतः घेतला आहे - 'व्याख्यानं आणि वृत्तपत्रं', 'आणखी एक ओसरते माध्यम' या संपादकीयांतून. त्याच्यावरून असं दिसतं की मराठी भाषकांना वाचनाचा-श्रवणाचा कंटाळा नाही, काही विचार देऊ पाहणाऱ्या लेखनाकडे वा भाषणाकडे ते पाठ फिरवीत आहेत. हलकंफुलकं, ऐकावं-वाचावं आणि विसरून जावं अशा मजकुराला त्यांची ना नाही. जे विचार परंपरेने त्यांच्या मनात अगोदरच रुजलेले आहेत त्यांची पुनरुक्ती असली तर त्यांना कंटाळा येत नाही, उलट ते सुखावतात. विचारांचा आभास उत्पन्न होत असला, पण विचारांना सामोरं जाताना थोडीसुद्धा मेहनत पडत नसली तर ते खूपच खूष असतात. दुसराही एक मुद्दा आहे. काहींच्याजवळ सांगण्याजोगं काही अवश्य असतं, ते सांगावं अशी इच्छाही असते, पण सभाधीटपणाच्या अभावी हे लोक भाषण देऊ शकत नाहीत. व्यासपीठावरून तर नाहीच नाही. यांच्याच जोडीला असेही काहीजण असतात की ज्यांना पांढऱ्यावर काळं करायची भीती वाटते, प्रकाशनार्थ पांढऱ्यावर काळं करायची भीती तर वाटतेच वाटते. (आता काही वक्ते आणि लेखक असेही असतात की ज्यांना सभाधीटपणा नसता किंवा लेखनधीटपणा नसता तर किती बरं झालं असतं असं वाटून जातं - कवी-झुंड-संमेलनाहून परतताना तर वाटतंच वाटतं ! पण ते जाऊ दे.) या ठिकाणी आपल्या शिक्षणव्यवस्थेमधली एक त्रुटी लक्षात येते. अक्षरओळख झाली म्हणजे पुरे, नंतर कसदार मजकूर वाचायचा-लिहायचा कसा हे काय शिकवायचं, ते विद्यार्थ्यांच्या उपजत देणगीवर सोपवायचं अशी भूमिका शिक्षक घेऊ पाहतात. (शिक्षणक्रमात निबंधलेखन असा विषय तरी असतो, पण ललितेतर मजकूर वाचायचा कसा असा विषयही नसतो, 'आमच्या लहानपणी'ही तो नव्हता. तेव्हा सगळा दोष शिक्षकांच्या कुचराईवर टाकता येत नाही.) भाषणं कशी ऐकायची - द्यायची याचा तर विचारही केला जात नाही. वक्तृत्वस्पर्धा नावाचा एक प्रकार शिक्षणक्रमाबाहेर कधी राबवला जातो, तिथेही विद्यार्थ्यांच्या उपजत देणगीवरच सारी भिस्त असते. जे विद्यार्थी अशा स्पर्धेत बोलत नाहीत, फार काय स्पर्धेतली भाषणं ऐकायलाही जात नाहीत त्यांच्या शिक्षणाचं काय?

(बहुसंख्य विद्यार्थी तर याच कोटीत पडतातना.) अमेरिकेची आपण सध्या जिथेतिथे नक्कल करीत आहोत. पण 'क्रीएटिव्ह रायटिंग' किंवा 'स्पीच अँड ड्रामा' यांसारख्या विषयांचा आपल्या शिक्षणक्रमात अजूनही समावेश केला गेलेला नाही. भाषण ऐकायचं कसं, द्यायचं कसं, वैचारिक मजकूर वाचायचा कसा, लिहायचा कसा हे सगळं शिकवायचं आपण मनावर घेतलं तर ते शिकवायचं कसं याची आखणी आपल्याला कल्पकतेनं आणि विचारपूर्वक केली पाहिजे. परीक्षेची तयारी करून घेणं आणि नंतर परीक्षा घेणं या सध्याच्या पद्धतीवर विसंबून चालणार नाही. (नाहीपेक्षा ललित मजकूर लिहायचा कसा याचा एक अनौपचारिक पत्रव्यवहारवर्ग 'सत्यकथे'च्या संपादक-वर्गानं काही वर्षं इमानेइतबारे चालवला होता तसा काही प्रकार... पण आज तशा इमानाचे संपादकही नाहीत आणि तशा नम्रतेचे शिक्षार्थी लेखकही नाहीत. भावी लेखकांना-वक्त्यांना ते 'भावी' असेपर्यंतच पकडावं, ते 'बनचुके' होईपर्यंत वाट पाहू नये हे बरं ! जबाबदार माणसानं प्रतिकूल परीक्षण लिहिलं तर लगेच फणा उगारणारे आजचे लेखक !) या सगळ्याच प्रश्नांचा जोरदार पाठपुरावा व्हायला पाहिजे.

□

**अशोक रा. केळकर**

---

'भाषा आणि जीवन'च्या वर्ष १५ अंक १ ला' या अंकातील पृ. ३४ वरील पानपूरकामध्ये एका इंग्रजी सुवचनाचे मराठीत चांगले भाषांतर करण्याचे आवाहन केले होते. त्यावर डॉ. भास्कर गिरधारी यांनी पुढील भाषांतरे सुचविली आहेत.

मूळ सुवचन - Good times, Bad times, Books for all times.

सुचवण्यात आलेली भाषांतरे :-

१. चांगला काळ, वाईट काळ, ग्रंथ मात्र सर्वकाळ.

२. भला काळ, बुरा काळ, ग्रंथ मात्र सर्वकाळ

३. काळ चांगला असो की वाईट असो, ग्रंथसहवास मात्र सदा सर्वकाळ.

यांतील दुसरा पर्याय छान आहे नाही ?

□

---

# रूपक आणि रूपितांग : अर्थांतरणाची प्रक्रिया

शैलेश सदाशिव पुंडलीक

### भाग पहिला : सोस्यूर यांच्या काही संकल्पनांचे स्पष्टीकरण

**प्रास्ताविक :** फेर्दिनां द सोस्यूर या प्रख्यात स्विस भाषावैज्ञानिकाच्या संवर्ग (paradigm, संवर्णात्मक = paradigmatic) आणि संबंधन (syntagm, संबंधनात्मक = syntagmatic ) या संकल्पनांचा आधार धत घेत रोमां याकोबसन यांनी त्यांच्या रूपक (metaphor) आणि रूपितांग (metonymy) यांसंबंधीची उपपत्ती मांडली.[१] भाषाव्यवहारातील अर्थनिष्पत्ती, अर्थनिर्धारण, अर्थसंधारण या प्रक्रियांचा अभ्यास करणाऱ्या विद्यार्थ्याला त्यातील एक महत्त्वाचा टप्पा म्हणजे अर्थांतरण (अर्थबदल किंवा displacement of meaning) या प्रक्रियेचा अभ्यास करावा लागतो. ही प्रक्रिया रूपकांचा वापर करून घडत असल्यामुळे याकोबसन यांच्या विचारांचा पाठपुरावा करणे आवश्यक आहे. तसेच सोस्यूर यांनी ज्या काही मूलभूत तत्त्वांचे आयुष्यभर चिंतन केले त्यांचे निबंधन करणाऱ्या काही संकल्पनांचा विचार करणे आवश्यक आहे. म्हणून मी नमनाच्या या घड्याचे तेल सोस्यूर यांच्या स्मृतीचा दीप प्रज्वलित करण्यासाठी वापरत आहे.

सोस्यूर यांच्या मूलगामी प्रतिभेसंबंधी कुणालाही कधी शंका नव्हती. प्रख्यात तत्त्वज्ञ अर्न्स्ट कॅझिरर यांनी तर सोस्यूरनी भाषाविज्ञानात जी क्रांती घडवून आणली तिची तुलना गॅलिलिओने सतराव्या शतकात पदार्थविज्ञानात घडवून आणलेल्या क्रांतीशी तुलना केली.[२] सोस्यूर यांच्या बौद्धिक श्रेष्ठतेसंबंधी अनेक गमतीच्या (आणि सत्य) घटना सांगितल्या जातात. त्यांतील काही इथे नमूद करायला हरकत नाही. वयाच्या अवघ्या एकविसाव्या वर्षी इ.स. १८७८ मध्ये त्यांनी Memoire sur le systéme primitif des voyelles dans des langues indo-européenes (मेम्वार स्युर ल सिस्तेम प्रिमितिफ दे व्हॉयेल दा दे लांगज् अँदोयुरोपियन - यापुढील चर्चेत मी या पुस्तकाचा उल्लेख केवळ 'मेम्वार' असा करीन.) या नावाचे पुस्तक बेर्लिनमध्ये प्रसिद्ध केले. एका भाषावैज्ञानिकाच्या मते

तुलनात्मक भाषाशास्त्रात लिहिला गेलेला तो सर्वोत्कृष्ट ग्रंथ होता. मेम्वारच्या प्रकाशनानंतर ते लिपृझिगला परत आले. (ते त्यावेळी लिपृझिग आणि बेर्लिन या विद्यापीठांमध्ये पीएच्.डी. या पदवीसाठी अभ्यास करत होते.) तेव्हा पोरसवदा वाटणाऱ्या सोस्यूरना एका प्राध्यापकाने प्रश्न विचारला की प्रख्यात स्विस भाषाशास्त्रज्ञ एफ्.द.सोस्यूर यांच्याशी त्यांचे काही नाते आहे का (!) वयाच्या अवघ्या बावीसाव्या वर्षी त्यांनी संस्कृतमधील षष्ठीविभक्ती या विषयवार एक विद्वन्मान्य (Summacum laude) असा प्रबंध लिहून पीएच्.डी. ची पदवी मिळवली. खुद्द मेम्वारमध्ये त्यांनी मांडलेल्या एका प्रमुख निष्कर्षाचे पुष्टीकरण त्यानंतर पन्नास वर्षांनी उपलब्ध झालेल्या पुराव्याने झाले![३] आणि ज्या Cours de linguistique génrale (कुर द लँग्विस्तिक जेनेराल - यापुढच्या विवेचनात मी याचा उल्लेख फक्त 'कुर' असा करीन.) या ग्रंथामुळे त्यांचे नाव जगात सर्वत्र गाजले तो तर त्यांनी स्वत: लिहिलेलाच नव्हता, तर त्यांच्या व्याख्यानांच्यावेळी त्यांच्या विद्यार्थ्यांनी घेतलेल्या टिपणांच्या आधारे त्यांचे सहकारी प्रा. शार्ल बाली (Charles Bally) आणि आल्बेर सेशेहाये (Albert Sechehaye) यांनी संपादित करून तयार केला होता![४]

इ.स. १८७८ मध्ये प्रकाशित झालेले 'मेम्वार' आणि १९१६ मध्ये प्रकाशित झालेले 'कुर' यांच्यात तब्बल चार दशकांचा कालावधी जावा लागला. सोस्यूर यांच्या नवसर्जक संशोधनाचे मूल्य वादातीत होते. पण तत्कालीन भाषाभ्यासाच्या व्यवस्थेवर ते अतिशय नाराज होते. तीत आमूलाग्र बदल घडवून आणणे आवश्यक आहे, अन्यथा भाषेबद्दल दहासुद्धा यथायोग्य वाक्ये लिहिता येणार नाहीत हे त्यांना जाणवत होते. त्यामुळे आधीच मितलेखी असणाऱ्या सोस्यूर यांच्या लिखाणाचा ओघ पुढे पुढे आटत गेला. भाषाशास्त्रात बदल घडवून आणण्यासाठी एक पुस्तक लिहायचाही त्यांचा मनोदय होता. पण प्रत्यक्षात मात्र तसे पुस्तक त्यांच्या हातून कधीही लिहिले गेले नाही.[५] त्यामुळे 'कुर' प्रसिद्ध होण्यापूर्वी बाह्य जगताला त्यांची ओळख 'मेम्वार' चे लेखक इतकीच होती.

एका दृष्टीने पाहिले तर 'मेम्वार' हे एक अतिशय दुर्दैवी पुस्तक आहे असे म्हणायला हवे. ते त्यांनी स्वत: लिहिलेले होते. 'कुर' प्रसिद्ध झाले तरी त्यांचे नाव भाषाशास्त्राच्या क्षेत्रात अजरामर करण्याइतकी त्याची योग्यता होती. ज्या काही मूलगामी - मूलतत्त्वांचे चिंतन सोस्यूरनी आयुष्यभर केले (आणि जी 'कुर' मध्ये नमूद झालेली आहेत.) त्यांचाच वापर करीत त्यांनी 'मेम्वार' मधील तर्ककठोर प्रमेये मांडली. त्यांना अभिप्रेत असणाऱ्या मूलतत्त्वांचा मागोवा त्यातूनही घेता आला असता. पण मुळात मेम्वार अतिशय तांत्रिक स्वरूपाचे आणि तर्ककठोर असल्यामुळे त्याला विस्तृत वाचकवर्ग लाभला नाही. युरो-भारतीय भाषांच्या अभ्यासकांच्या वर्तुळाबाहेर त्याचे नावही बहुथा ऐकू येत नाही. सर्वसामान्यपणे

विसाव्या शतकात अनेकविध विचारशाखांवर सोस्यूर यांचा जो प्रभाव पडला त्याला ते कारणीभूत होऊ शकले नाही. याउलट, त्यांनी न लिहिलेल्या पण त्यांच्या नावाशी निगडित असलेल्या 'कुर' ने मात्र त्या मूलतत्त्वांचे उद्‌गान केले. तर्ककठोर असूनही त्याच्या सुगमतेमुळे त्याला उदंड वाचकवर्ग लाभला, आणि विसाव्या शतकातील विचारधारांना एक नवी दिशा देणाऱ्या क्रांतिकारी विचारवंतांच्या यादीत त्यांचे नाव दाखल झाले. प्रस्तुत निबंधातील विवेचनातही 'कुर' मधील संकल्पनाच आधारभूत मानलेल्या आहेत.

'कुर' चे महत्त्व :- वर म्हटल्याप्रमाणे सोस्युर यांनी 'कुर' प्रत्यक्षात कधीच लिहिले नाही तर त्यांच्या व्याख्यानांच्यावेळी त्यांच्या विद्यार्थ्यांनी केलेल्या टिपणांचे संकलन आणि संपादन करून त्यांच्या सहकाऱ्यांनी त्याची रचना केली. खरे म्हणजे विद्यार्थ्यांनी केलेल्या टिपणांच्या आधारे आपले विचार ग्रंथरूपाने प्रकाशित व्हावे या विचाराने एखाद्याला कापरेच भरायचे. (ते सोस्यूरना शक्य नव्हते कारण 'कुर' च्या प्रकाशनाच्या तीन वर्षे आधीच त्यांचे देहावसान झाले होते. पण त्यांचे विद्यार्थी विशेषत: बाली आणि सेशेहाये यांनी त्यांच्या व्याख्यानांची विस्तृत आणि विश्वसनीय टिपणे घेतलेली होती.) आणि सर्वांच्याच सुदैवाने त्यांचे सहकारी बाली आणि सेशेहाये हे सुद्धा उत्कृष्ट संपादक होते. त्यांच्या संपादित आवृत्तीतील सर्वच गोष्टींवर सोस्यूरनी पसंतीची मुद्रा उठवली असती असे नव्हे, पण ते महत्त्वाचे नाही. महत्त्वाचे आहे ते हे की 'कुर' ने रचनात्मक भाषाविज्ञान (किंवा खरे म्हणजे नुसत्याच भाषाविज्ञान) या एका नव्या विषयाचा पाया घातला आणि इतिहास घडवला. जगातील अतिशय सामर्थ्यवान, प्रभावशाली अशा ग्रंथामध्ये त्याची गणना होते. त्यातील संकल्पना एकाच वेळी अनेक स्तरांवर, अनेक दिशांनी कार्यरत आहेत असे आढळते. या विधानाचे अधिक स्पष्टीकरण मी पुढच्या भागात करीन.

'कुर'मध्ये उपलब्ध होणाऱ्या संकल्पनांचा अनेक प्रज्ञावंत अभ्यासकांनी अतिशय अंतर्दृष्टिपूर्वक (Insightfully) उपयोग करीत त्यांच्या विविध क्षेत्रांत मोलाची भर घातली आहे. उदा. क्लोद लेव्हिस्त्रोस (Claude Levi-Strauss) त्यांचा वापर मानववंशशास्त्राच्या अभ्यासात करतात,[६] तर जाक लाकां (Jacques Lacan) त्यांचा वापर मनोविश्लेषण आणि वाङ्मयीन समीक्षेत करतात.[७] रोलां बार्थ (Roland Barthes) त्यांचा वापर कथनविज्ञानात (narratology) करतात.[८] तर मिशेल फुको (Michael Foucault) समाज आणि व्यक्ती यांच्या परस्परसंबंधाच्या अभ्यासात त्यांचा परामर्श घेतात.[९] जाक देरिदा (Jacques Derrida) हे तत्त्वज्ञान, वाङ्मयीन चर्चा वगैरे विषयांत त्यांचा वापर करतात.[१०] भाषाविज्ञानापुरतेच बोलायचे तर त्यांच्याच संकल्पनांचा प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष पाठपुरावा करीत युरोपातील प्राग येथे

याकोबसन आणि ट्रूबेट्झकॉय[११], कोपनहेगन येथे येलमस्लेव आणि त्यांचे सहकारी[१२], आणि अमेरिकेतील लेनार्ड ब्लूमफील्ड[१३] यांच्यामुळे प्रभावित झालेली भाषावैज्ञानिकांची एक संपूर्ण पिढी आणि बी.एफ्.स्किनर यांच्या यांत्रिकी मानसशास्त्रावर कठोर टीका करणारे नोम चॉम्स्की[१४] वगैरेंसारख्या अभ्यासकांनी त्यांच्या त्यांच्या संशोधनाच्या दिशा ठरविल्या. विशेष म्हणजे 'आस्पेटक्स् अव दि थिअरी अव् सिंटॅक्स' या आपल्या प्रख्यात ग्रंथात आपल्या रचनांतरी सृजनवादी व्याकरणाच्या उपपत्तीची आधारशिला ठेवताना चॉम्स्की यांनी सुरुवातीच्या प्रकरणात सोस्यूर यांचाच कटाक्षाने आधार घेतला हे लक्षणीय आहे. (गंमत म्हणजे या विभागात चॉम्स्की यांनी उल्लेखलेला दुसरा एकमेव ग्रंथकार म्हणजे स्वत: चॉम्स्कीच आहेत.) एकूणच, काही मर्यादित सन्माननीय अपवाद वगळले तर संपूर्ण विसाव्या शतकातील भाषाविज्ञानाचा अभ्यास म्हणजे सोस्यूर यांच्या 'कुर' वर लिहिलेल्या तळटीपांची लांबच लांब यादी आहे असे म्हणायला प्रत्यवाय नाही.

**भाषेची आकारिकता (Structuralness / formalness structurality of language)**

प्रत्यक्षात भाषेसंबंधीच्या सोस्यूर यांच्या सर्वच कल्पना नवीन होत्या असेही नाही आणि त्या फार वेगळेपणाने मांडल्या होत्या असे सुद्धा नाही. उदा. भाषेच्या सामाजिकतेसंबंधीची पर्यायाने यदृच्छतेबद्दलची आणि चित्रव्यवस्थेबद्दलची त्यांची संकल्पना की जी आज आधुनिक भाषाविज्ञानाचा पाया झाली आहे ती विल्यम ड्वाईट व्हिटनी[१५] या अमेरिकन भाषावैज्ञानिकांच्या पुस्तकात आढळते. स्वत: सोस्यूर यांनीही त्याचा ऋणनिर्देश केलेला आहे.[१६] ज्या संवर्गात्मक (paradigmatic - स्वत: सोस्यूर यांनी वापरलेला शब्द associative असा आहे) आणि संबंधनात्मक अर्थांच्या आधारावर हा निबंध लिहिला जात आहे ते सुद्धा खऱ्या अर्थाने आपले जुने मित्रच म्हणजे parts of speech आणि वाक्यरचना हेच आहेत असे आढळते. पण सोस्यूर यांचे वैशिष्ट्य हे की त्यांनी या सर्व संकल्पनांना एक आकारिक व्यवस्थेचे (Formal System) स्वरूप दिले. म्हणजे त्या कल्पना त्यांच्या त्यांच्या वैयक्तिक पातळीवर व्याख्यायित करून वापरता येतात हे खरे. पण त्यांचा विचार एका सर्वसाधारण व्यवस्थेचे घटक म्हणून केला की त्या एकमेकांशी ज्या अनेकविध संबंधांत interaction च्या स्वरूपात उपलब्ध होतात तीमुळे त्यांना जी विलक्षण अर्थगर्भता प्राप्त होते तिचाच वापर लेव्हि-स्त्रोस, देरिदा, बार्थ यांच्यासारखे प्रज्ञावंत अभ्यासक करीत असतात. भाषाविज्ञानाला ही आकारिकता प्राप्त करून - चिह्नविज्ञानाची रूपरेषा मांडणारे सोस्यूर हे पहिले वैज्ञानिक ठरले.

'कुर'मधील संकल्पना स्वतंत्रपणे आणि स्वयंपूर्णपणे व्याख्याबद्ध करता येतात

हे सत्य आहे. पण त्यांच्या व्याख्या करून झाल्यावर त्यांच्या एकमेकांशी असलेल्या संबंधांचा विचार सुरू केला की त्यांच्या अर्थांच्या अनेक पूर्वानुमानित छटा लक्षात यायला सुरुवात होते. या कारणामुळे मी या आधी पृष्ठ ३ च्या मध्याशी 'त्या संकल्पना एकाच वेळी अनेक स्तरांवर, अनेक दिशांनी कार्यरत आहेत असे आढळते' असे विधान केले होते. या संकल्पनांचे विवरण जोनाथन कुलर यांनी आपल्या **सोस्यूर** या पुस्तकात केलेले आहे. प्रत्यक्षात या छोट्या निबंधात त्यांचे समग्र विवरण करणे शक्य होणार नाही. मुख्य म्हणजे या निबंधाचा तो उद्देश नाही. पण या संकल्पना अनेक ठिकाणी, अनेक पद्धतींनी वापराव्या लागतात, वापरता येतात त्यावेळी त्यांची ही आंतरिक व्यवस्था माहीत नसेल तर हा समीक्षक जादूगाराच्या पोतडीतून अनेक चिजा निघतात त्याप्रमाणे आपल्याला सोयीच्या असणाऱ्या संकल्पना हव्या तेथे वापरून आपले म्हणणे सिद्ध करायचा प्रयत्न करीत आहे असा वाचकाचा समज होऊ शकतो. म्हणून त्यांचे स्वरूप स्पष्ट करण्याचा मी प्रयत्न करीत आहे.

उदा. चिह्न, चिह्नित, चिह्निक (Sign, signified, signifier) म्हणजे शब्द, शब्दार्थ आणि शब्दध्वनी (आता खरे म्हणजे शब्द या शब्दाचाच अर्थ ध्वनी आहे तेव्हा शब्दध्वनी ही पुनरुक्ती आहे. पण इथे मी शब्द हा शब्द त्याच्या मराठी अर्थाने वापरलेला आहे. चिह्न यासाठी सुद्धा शब्द हा शब्द अप्रस्तुतच आहे. पण मी इथे त्यात फार काटेकोरपणा आणू शकत नाही.) या त्रिदलाची व्याख्या लक्षात घेतली की संवर्ग (para-digms, categories of words, parts of speech) आणि सहस्थिती, वाक्यरचना (syntax, syntagmatic) यांचे मर्म समजायला सुरुवात होते. पण प्रत्यक्षात संवर्ग कसे मांडता येतात - म्हणजे शब्दांच्या जाती कशा ठरविता येतात याला काही स्वयंपूर्ण, स्वयंस्थित कसोटी उपलब्ध होत नाही. म्हणजे संवर्गांतर्गत शब्दात, पदबंधात वगैरे स्वत:चे असे काही नसते की त्यामुळे त्यांचा संवर्ग ठरविणे शक्य व्हावे. ते वाक्यरचनेत कोणत्या स्थानात आढळतात - म्हणजे प्रत्यक्ष वापरात ते कसे वागतात, भाषाव्यवस्थेत त्यांचे इतर घटकांशी काय नाते आहे यावर त्याचे अर्थ, त्यांचे चिह्नांकन आणि त्यांचा संवर्ग ठरतो. प्रत्यक्षात चिह्न या स्वरूपात उपलब्ध नसलेले ध्वनिसंघात वाक्यरचनेत खऱ्या अर्थाने वापरताच येत नाहीत. म्हणजे 'चिह्न' समजल्याखेरीज सहस्थिती समजत नाही आणि सहस्थिती समजल्याखेरीज चिह्न समजत नाही. पुन्हा या दोन्ही संकल्पनांचे व्यक्तिगत आणि युग्मत: पातळीवरही इतर संकल्पनांशी तसेच वेगवेगळे संबंध आहेतच. त्यामुळे कोणत्याही संकल्पनेचा विचार तिचे इतर संकल्पनांशी व्यक्तिगत आणि सांघिक पातळ्यांवर असलेल्या संबंधाच्या अभ्यासाखेरीज करता येत नाही. त्यामुळे प्रत्येक वेळी प्रत्येक नव्या अभ्यासात

त्यांच्या अर्थांचे अनेक नवनवे पैलू दृग्गोचर होत राहतात. अशी ही अतिविलक्षण सृजनशील व्यवस्था आहे. भाषेच्या या आकारिकतेचे यथार्थ विवरण शब्दबद्ध करता येईल असे मला व्यक्तिश: वाटत नाही. एखाद्या गूढवादी तत्त्वज्ञाच्या सत्य आकलनाच्या अनुभवाप्रमाणे हा अनुभवही शब्दातीत आहे असे वाटत राहाते. काही नव्या आणि काही जुन्या अशा कल्पनांची निर्मिती आणि नूतनीकरण करत करत सोस्यूर यांनी भाषेच्या आकारिक स्वरूपाच्या आकलनाचा पाया घातला आणि भाषाभ्यासाच्या क्षेत्रात क्रांती घडवून आणली.

चिह्ने आणि त्यांची एकमेकांशी असणाऱ्या संबंधातून कार्यरत होणारी आकारिकता विचारसंप्रेषणात कशी वापरली जाते, याचे उत्कृष्ट उदाहरण रेल्वेगाड्यांची आत्मस्थिती (identity) ठरवण्यात आढळून येते. उदा. (सोस्यूर यांची क्षमा मागून) आठ तेवीसला जी जिनिव्हा पारी गाडी निघते तिच्यात स्वत:चे असे काय विशेष आहे की ज्यामुळे तिच्या आत्मस्थितीचा बोध व्हावा ? उदा. नऊ पस्तीसच्या जिनिव्हा - बर्न गाडीत आणि तिच्यात असा काय फरक आहे की ज्यामुळे त्या दोन्हींचीही आत्मस्थिती सिद्ध होते ? वास्तविक पाहाता त्यांचे जडद्रव्य (त्यांचे रेक्स बनवण्यासाठी वापरलेले द्रव्य, त्याचे कर्मचारी इ.) दोन्ही गाड्यांच्या बाबतींत काही वेगळे नसते. आज जो रेक जिनिव्हा - बर्नसाठी वापरलेला आहे तोच रेक जिनिव्हा - पारीसाठी सुद्धा वापरता येतोच. मग आठ तेवीसच्या जिनिव्हा-पारी ट्रेनमध्ये असे काय आहे की ती इतर गाड्यांपासून वेगळी काढता येते ? - की ज्यामुळे ती आठतेवीसची जिनिव्हा - पारी गाडी आहे, अन्य कोणतीही गाडी नाही असे म्हणता येते ? सोस्यूर यांचे उत्तर असे आहे की जिनिव्हा - पारी गाडी ही इतर गाड्यांशी आकारिक फरकाने संबद्ध आहे. एकूणच ती इतर गाड्यांशी किंवा तत्सम वस्तूंशी व्यतिरेकाच्या (contrast) परिस्थितीत आढळते. या एकाच कारणामुळे तिची आत्मस्थिती सिद्ध होते. आता कधी कधी ती नऊपस्तीसच्या जिनिव्हा - बर्न गाडीपेक्षा उशिरा रवाना होऊ शकेल. (आमच्या प.रे., म.रे.च्या प्रवाशांना ती कधी तरी वेळेवर सुटते आणि वेळेवर पोचते याचेच कौतुकमिश्रित आश्चर्य वाटेल.) पण तरीही ती आठतेवीसचीच पण काही कारणांमुळे थोडी उशिरा सुरू होणारी जिनिव्हा गाडी राहते - तिचे इतर कोणत्याही गाडीत रूपांतर होऊ शकत नाही. या व्यतिरेकाखेरीज किंवा जॅक देरिदा यांच्या शब्दात difference खेरीज तिची आत्मसिद्धी होऊ शकत नाही. तिच्याशी contrast न होऊ शकणाऱ्या गाड्या तिला सममूल्य किंवा खरे म्हणजे तदात्मच असतात. फक्त तिच्याशी contrast होऊ शकणाऱ्या गाड्याच स्वतंत्र एकके म्हणून वापरता येतात.

Difference मुळे सिद्ध होणाऱ्या भाषेमधील आत्मसिद्धी आणि तादात्म्याचे

उत्कृष्ट उदाहरण ध्वनिविज्ञानात आढळते. (ट्रूबेट्झकॉय यांची क्षमा मागून), उदा. मराठीत प आणि फ हे अर्थवाही असे ध्वनी आहेत. कारण त्यांच्यामध्ये असणारा फरक अगदी लघुतम आहे आणि इतर सर्व संदर्भ समान असताना केवळ या लघुतम फरकाच्या आधारावर मराठी भाषक शब्दांचे वेगवेगळे अर्थ लावू शकतो. उदा. पळ / फळ, पार / फार, पाळ / फाळ इ.इ. त्यामुळे मराठी भाषकासाठी प आणि फ असे हे दोन्ही स्वतंत्र स्वनिम आहेत. आता मराठीतील प आणि फ हे दोन्ही जसे (ओष्ठ्य, अघोष आणि स्फोटस्वरूप) उपलब्ध आहेत तसेच इंग्रजीतही (ओष्ठ्य, अघोष, स्फोटस्वरूप असे) P आणि Ph उपलब्ध होतातच. पण इंग्रजी माणूस pin आणि phin यांच्यामध्ये फरक करत नाही. त्याच्या दृष्टीने दोन्ही ध्वनी एकाच स्वनिमाची दोन रूपे आहेत. त्यांमध्ये फरक करण्यासाठी त्याला (ओष्ठ्य, अघोष, स्फोट अशा प च्या जागी ओष्ठ्य आणि स्फोट असणाराच पण यावेळी सघोष असलेला) ब हा ध्वनी वापरावा लागतो. त्याच्या दृष्टीने pin आणि bin हे भिन्न अर्थांचे शब्द आहेत. म्हणजे /P/ आणि / b / हे दोन भिन्न, एककी (Unitary) असे स्वनिम आहेत. दोन गोष्टी, दोन गाड्या, दोन ध्वनी, दोन व्यक्ती यांच्यामध्ये व्यतिरेक नसेल तर त्यांच्यात तादात्म्य मानायला हवे. (ओष्ठ्य, अघोष पण स्वल्पप्राण असणारा) प (ओष्ठ्य, अघोष पण महाप्राण असणाऱ्या) फ च्या व्यतिरेकात उपलब्ध होतो म्हणून मराठीत ते भिन्न स्वनिम आहेत, तर (अल्पप्राण आणि महाप्राण यांच्यातील फरक महत्त्वाचा न मानणाऱ्या) व्यतिरेकात न आढळल्याने इंग्रजीत ते तदात्म आहेत.

भाषेमधील difference या तत्त्वाने काही मौलिक मुद्दे नजरेला आणलेले आहेत. उदा. राम आणि सीता या शब्दांमध्ये असे काय आहे की ज्यामुळे ते भिन्न एकक होतात ? इथेसुद्धा राम या शब्द चिह्नाने कुणा एका सजीव, ऐतिहासिक / वर्तमान, जड द्रव्यमयी अशा व्यक्तीचा उल्लेख होतो आणि ती व्यक्ती सीता या व्यक्तीपेक्षा वेगळी आहे म्हणून त्यांची स्वतंत्र आत्मसिद्धी होते असे म्हणता येत नाही. कारण एकाच शब्दाने पुरुष आणि स्त्री या दोघांचाही उल्लेख होऊ शकतो अशी नावे आपल्याला माहित आहेतच. उदा. Evelyn, Frances / Francis, निकिता, रॉबिन इ.इ. कोणत्या ध्वनिचित्राने कोणत्या मानसिक चित्राचा निर्देश होतो, किंवा तो त्याचा अर्थ आहे असे म्हणता येते, हे त्याच्या वस्तुद्रव्यावर अवलंबून नाही. मग राम शब्दाने केवळ एका कोदंडधारी जगज्जेत्याचा उल्लेख होईल असे नव्हे. त्याने कदाचित एखाद्या सूटबूटधारी व्यक्तीचाही उल्लेख होईल आणि आमच्या इंग्रजीच्या हव्यासाने त्याचे इंग्रजी रूपांतर Rama असे केले तर कोणता स्वर ऱ्हस्व आणि कोणता दीर्घ आहे ते समजणे दुरापास्त असल्याने (राम पुल्लिंगी तर रमा आणि रामा हे दोन्ही स्त्रीलिंगी असे) तीन

भिन्न भिन्न शब्द मिळतात. त्या शृंगापत्तीतून सुटण्याचा मार्ग म्हणजे वाक्यातील त्यांचा उपयोग पहाणे.

राम अयोध्येचा राजा होता

* रमा / रामा अयोध्येचा राजा होता.

याप्रमाणे राम शब्द रमा/रामा यांच्यापासून भिन्न आहे असे दिसते.

पण या प्रकाराच्या विवेचनातही धोके आहेतच.

| | |
|---|---|
| राम<br>दशरथ<br>दिलीप<br>अज<br>हरिश्चंद्र | हा अयोध्येचा राजा होता. |

यामध्ये राम, दशरथ, दिलीप एकमेकांच्या जागी समस्थित (Substitute) होऊ शकतात. पण म्हणून त्यात तादात्म्य मानता येत नाही. कारण इतर संदर्भात ते व्यतिरेकानेच आढळतात.

| | |
|---|---|
| राम हा | अयोध्येचा राजा होता<br>सीतेचा पती होता.<br>लवकुशांचा पिता होता.<br>रावणाचा विनाशकर्ता होता.<br>लक्ष्मणाचा भाऊ होता.<br>हिंदूंचा देव आहे. |

यातील वाक्यांपैकी फक्त पहिल्या वाक्यात राम शब्दाच्या जागी दिलीप, अज, हरिश्चंद्र हे शब्द समस्थित होऊ शकतात. याचा अर्थ इतर अनेक संदर्भात ते व्यतिरेकाने आढळतात. म्हणून ती भिन्न भिन्न एकके आहेत. त्यामुळे जी एकके किमान एका संदर्भात व्यतिरेक संबंधात आढळतात. त्यांची स्वतंत्र आत्मस्थिती होऊ शकेल.

एका संदर्भात समस्थितीत आढळणारी एकके तादात्म्य संबंधातच असतात असे नाही, हे दिलीप, अज, राम, दशरथ यांच्या उदाहरणांवरून स्पष्टच आहे. त्यासाठी वरचेच उदाहरण पाहा. राम हा एकच शब्द सुद्धा अनेक संदर्भांत वावरतो. आता ते एकच एकक आहे का ?

उदा. राम हा अयोध्येचा राजा होता.

राम हा हिंदूंचा देव आहे.

यांसारख्या वाक्यांतील राम हा शब्द एकच एकक आहे की दोन एकके आहेत? म्हणजे एकच एकक सर्वत्र वापरले जाते की अनेक एकके आपातत:

समस्वरूपी/आत्मसिद्ध वाटतात ?

त्यासाठी ज्या ज्या संदर्भात तो शब्द आढळतो त्यांचा विचार करायला हवा. राम हा शब्द प्रत्येक वाक्यात वेगळ्या एककाच्या रूपात आढळतो असे म्हणण्यास प्रत्यवाय नाही पण त्या सर्व एककांची स्वतंत्र आत्मस्थिती सिद्धी होण्यासाठी किमान एक संदर्भ असा हवा की ज्यात ते व्यतिरेकाने आढळतात. त्यामुळे आता तादात्म्याची व्याख्या करता येते ती अशी :

जी एकके सर्व संदर्भांत एकमेकांशी समस्थिती संबंधात आढतात त्यामध्ये तादात्म्य सिद्ध होते. तसेच जी एकके किमान एका संदर्भात व्यतिरेकाने आढळतात त्यांची स्वतंत्र आत्मसिद्धी होऊ शकते.

या सर्व विवेचनाला आधारभूत असणारी पण आतापर्यंत स्पष्टपणे नमूद न केलेली गोष्ट ही difference हे अद्‌भुत सामर्थ्य (similarity) समानतेच्या/समतेच्या पार्श्वभूमीवरच कार्य करू शकते. वाक्याचा अर्थ ठरविण्यासाठी शब्दांचे अर्थ तर शब्दांचे अर्थ ठरविण्यासाठी वाक्यांचे अर्थ माहीत असायला हवेत. याचाच अर्थ असा की अर्थनिर्धारणाची ही प्रक्रिया वाक्यातील एकस्तरीय (horizontal level) तर संवर्गातील बहुस्तरीय (vertical) अशा म्हणजे संवर्ग आणि सहस्थिती अशा दोन्ही अक्षांवर कार्यवाहीत ठेवावी लागते. हे लक्षात घेतले की सोस्यूर यांच्या संकल्पना किती अर्थगर्भ आहेत हे जाणवायला सुरुवात होते.

**भाग दुसरा : संवर्ग आणि सहस्थिती**

संवर्ग आणि सहस्थिती यांचे फरक मांडताना याकोबसन यांनी Selection (चयन) आणि combination (संबंधन) असे शब्द वापरले. त्यांच्या मते चयनाच्या अक्षावरून संबंधनाच्या अक्षावर सममूल्यतेचे तत्त्व प्रस्थापित केले म्हणजे भाषेच्या काव्यात्म कार्याचे स्वरूप स्पष्ट होते.[१७] आधी पाहिल्याप्रमाणे चयन अक्ष (axis of selection) हा समता, समानता, समधर्मिता, सममूल्यता, उदाहरणता (analogy) इत्यादी तत्त्वांवर आधारलेला आहे. राम आणि सीता हे दोन्ही शब्द वेगवेगळे एकक आहेत हे खरे आहे. पण निदान काही असे संदर्भ आहेत की ज्यांमध्ये ते एकमेकांच्या जागी समस्थित होऊ शकतात. मुख्य म्हणजे हे दोन्ही शब्द नाम या संवर्गाचे सभासद आहेत. त्यातील एक वाक्यामध्ये नामाच्या जागी आणि दुसरा क्रियापदाच्या जागी येणे असंभव आहे. त्यामुळे त्यांच्यातील संबंध याप्रमाणे सममूल्यतेचा आहे.

या उलट संबंधन अक्षावरील (axis of combination) पदे ही एका रेखीय संबंधात आढळतात. त्यांचे स्वरूप जवळता / सलगता (contiguity, proximity, nearness) निम्नस्थितता (Subordination) आणि सहस्थितिता

/ संस्थितता (coordination) या स्वरूपाचे असते. उदा. पाणी आणि आर्द्रता, शैत्य आणि बर्फ, राम आणि सीता, राम आणि लक्ष्मण / हनुमान, खुर्ची आणि टेबल यांसारख्या संबंधांत ही रेखीयता आढळते.

संवर्ग संबंधामुळे चिह्नांची मूल्ये ठरविणे हे difference मुळे मान्य होते तर संबंधनामुळे चिह्नांची मूल्ये ठरविणे हे त्यांच्या रेखीयतेमुळे शक्य होते. संवर्ग संबंधाचे आतापर्यंत बरेच विवेचन झालेले आहे. तेव्हा रेखीयतेचे थोडे स्पष्टीकरण करू. रेखीय संबंधनामुळे चिह्नांना जे अर्थ प्राप्त होतात ते व्याकरणिक अर्थ आहेत असे म्हणण्याची पद्धत आहे. मराठीत तृतीया विभक्ती वापरून (उदा. रामाने) त्या व्यक्तीचे कर्तेपण दर्शविले जाते. अशा प्रकाराने कर्तेपण दाखविण्यासाठी इंग्रजीत 'ने' सारखा स्वतंत्र रूपिम उपलब्ध होत नाही त्यामुळे

Rama was a king

आणि

Rama Killed Ravana

या दोन्ही वाक्यात 'राम' शब्दात काही फरक दिसत नाही. पण प्रत्यक्षात पहिल्या वाक्यात त्याची विभक्ती प्रथमा आहे तर दुसऱ्यात त्याची विभक्ती तृतीया आहे. यात महत्त्वाचे हे की अशा 'ने' सारख्या रूपिमांची उपलब्धी खऱ्या अर्थाने महत्त्वाची नाही. त्या त्या भाषेच्या प्रकृतीनुसार केवळ रेखीयतेमुळे होणाऱ्या वाक्यक्रमाने किंवा भाषेच्या सर्वसाधारण व्यवस्थेत शब्दांना ज्या ज्या जागा मिळतात, त्यानुसार त्यांचे भिन्न भिन्न व्याकरणिक अर्थ ठरले जातात. अगदी ही गोष्ट ज्या भाषांमध्ये अनेकविध रूपिम उपलब्ध आहेत त्यांच्या बाबतीतही खरी आहे. अगदी रूपिमांच्या बाबतीतही त्यांचे शाब्दिक अर्थ (lexical meanings) ठरविताना संवर्गता आणि रेखीयता यांचा विचार करावा लागतो. एक आहे म्हणजे दुसरे आहेच असे म्हणता येत नाही. उदा. मी पूर्वी एकदा वापरलेल्या उदाहरणात tap आणि pat किंवा cat आणि act यांच्यात संवर्गांतर्गत अर्थवाहिता दिसते. पण तेच atp किंवा atc यात अर्थवाहिता दिसत नाही. याचेही कारण त्यांच्यामध्ये रेखीयता असली तरी संवर्गता नाही असेच मानायला हवे.

कर्ता, कर्म, क्रियापद ह्या संकल्पना अशा प्रकारे व्याकरणिक अर्थ किंवा व्याकरणिक कार्ये (grammatical functions) आहेत. ती त्यांच्या सलगता (उदा. दोन विशेषणे, उदा सुसंघटित, सुव्यवस्थित भाषा) किंवा निम्नस्थितता (उदा. विशेषण, नाम), संस्थितता (उदा. नाम आणि नाम) या संबंधनांमुळे शक्य होतात.

संवर्गांचा विचार करतानाही असे आढळते की त्यांचे काही सभासद हे एकमेकांशी असेच कार्यात्म, व्याकरणिक स्वरूपात सहस्थिती दर्शवितात.

उदा. रामाचे पाय धावत गेले.

म्हणजेच राम धावत गेला. कारण पाय हे शरीराला अंगभूत आहेत तेव्हा शरीर आणि पाय हे सलगता किंवा विशेषत: निम्नस्थितता संबंधात जास्त प्रमाणात दिसतात.

उदा. डोळा हा शरीराचा महत्त्वाचा अवयव आहे.

इथे 'डोळा' या शब्दाचा 'शरीराचा' हा शब्द विशेष गुण दाखवितो. तेव्हा डोळा आणि शरीर किंवा शरीर आणि डोळा, घर आणि खिड़की, पेन आणि निफ एकमेकांशी रेखीय संबंधनात आढळतात. यांपैकी एकाला अंग तर दुसऱ्याला अंगी असे म्हणता येते. आपल्या यानंतरच्या विवेचनाच्या सोयीच्या दृष्टीने त्याला रूप आणि रुपितांग म्हणावे असे वाटते. त्यामुळे रूपाचा संबंध संवर्गाशी तर रूपांगाचा संबंध सहस्थितीशी जोडावा लागेल.

संवर्गासंबंधी लक्षात घेण्यासारखी महत्त्वाची गोष्ट ही की जेव्हा 'झोपडी' या शब्दाऐवजी त्याच संवर्गातील घर, (किंवा वाडा, किंवा महाल) यांसारखे शब्द वापरले जातील तेव्हा त्याचा अर्थ असा की तेच चिह्नित दर्शविण्यासाठी एका चिह्नकाच्या जागी दुसरे चिह्नक वापरले गेलेले आहे. हीच प्रक्रिया सहस्थितीबाबतही आढळून येते. म्हणजे 'झोपडी' या शब्दाऐवजी 'दार' खिडकी' असे शब्द वापरले गेले तर तिथेही एका चिह्नकाच्या जागी दुसरे चिह्नक वापरले गेलेले आहे.

एकाच चिह्निताच्या निर्देशासाठी त्याचे नेहमीचे चिह्नक न वापरता दुसरे एक चिह्नक वापरणे हीच क्रिया बहुधा काव्यातील रूपक या अलंकारात आढळते. वास्तविक अलंकार हे काव्यातच वापरले जातात असे नव्हे. सामान्य वाग्व्यवहारातही ते आढळतात. उदा. काँदिया (condillac) या प्रख्यात समीक्षकाने विनोदाने असे म्हटले आहे की बाजारातील भाषा व्यवहारात अवघ्या एका दिवसात जेवढे अलंकार वापरले जातात तेवढे संपूर्ण इनिड (Aenid) या महाकाव्यातही सापडत नाहीत. पण तरीही काव्य आणि सर्वसामान्य वाग्व्यवहार यांच्यात फरक करताना नेहमीच काव्याच्या आलंकारिकतेचा उल्लेख होतो. त्याची भाषा ही काव्यभाषा (poetic language) किंवा आलंकारिक भाषा (figurative language) तर सामान्य व्यवहारातील भाषा ही proper language सामान्य प्रमाण भाषा आहे असे म्हटले जाते.

काव्यात्म भाषा आणि सामान्य भाषा यांच्यांतील फरकासंबंधी अनेक विद्वानांनी अनेकविध विवेचने केलेली आहेत. इथे त्यांचा आढावा घेणे शक्य नाही.[१८] पण महत्त्वाचे म्हणजे रूपकामध्ये नुसताच एका चिह्नकाऐवजी दुसऱ्या चिह्नकाचा वापर होतो असे नव्हे तर त्याने एक वेगळ्या चिह्निताचाही विचार होतो -

एका रूपाऐवजी दुसरे रूप वापरले जाते. त्यामुळे रूपकाचा वापर हा सारत: संवर्ग अक्षावरील विविध चयनांपैकी (choices) एकाचा वापर आहे. याउलट रूपितांगामध्ये एका रूपाऐवजी तत्संलग्न, किंवा तदंगीभूत अशा चिह्निकाचा वापर होतो. हा सारत: संबंधन अक्षावरील चयनांपैकी एकाचा वापर असतो. त्या दृष्टीने पाहता चयन अक्षावरील उपलब्ध असे चिह्नक आणि संबंधन अक्षावरील उपलब्ध असणारे चिह्नक ही सममूल्य म्हणायला हवीत. (एका रूपासाठी दुसरे रूप वापरणे) याला इंग्रजीत metaphor असे म्हणतात. तर रूपाऐवजी रूपितांग वापरण्याच्या प्रक्रियेला metonymy असे म्हणतात. 'सैनिक' आले असे म्हणण्याऐवजी 'भाले/तलवारी आले/आल्या' असे म्हणणे ही metonymy आहे. 'मनुष्य जागा होणे' यासाठी 'डोळे उघडणे' असे म्हटले तर इंग्रजीत पूर्ण शरीराऐवजी त्याच्या एखाद्या भागाचा उल्लेख करण्याच्या क्रियेमुळे Synecdoche हा अलंकार तयार होतो. हाही metonymy चा प्रकार आहे.

एका चिह्नितासाठी वापरल्या जाणाऱ्या चिह्नकाचा उपभोग प्रवास दुसऱ्या एका चिह्नितापर्यंत कसा होतो, का होतो, त्याचे स्वरूप काय आहे, त्याचा परिणाम काय होतो, तो परिणाम समजण्याचे आणि त्याचे परिणामकारकत्व ठरविण्याचे निकष काय आहेत वगैरे प्रश्न म्हणजे शैलीवैज्ञानिकाला भेडसावणाऱ्या हिमनगाचे वरचे शिखर तेवढे आहे. याही प्रश्नांना फारशी समाधानकारक उत्तरे मिळताना आढळत नाहीत. त्यांच्या उत्तरांनी निर्माण होणाऱ्या प्रश्नांचे समाधान दूरच राहिले. दीपस्तंभ प्रकाशात नसता काळोख्या रात्री खडकांनी भरलेल्या आणि खवळलेल्या समुद्रात तारू हाकण्याचे वेडे धाडस दाखवणारेच अशा प्रश्नांची उत्तरे मिळवण्याच्या फंदात पडू शकतात.[१९]

**शरीरशास्त्र आणि भाषाविज्ञान**

एकोणिसाव्या शतकाच्या अखेरीस आणि विसाव्या शतकाच्या पूर्वार्धात वैद्यकीय शास्त्रात विलक्षण झपाट्याने प्रगती होत गेली आणि त्यामध्ये अनेक नवनवे शोध लागणे शक्य झाले. विशेषत: विचारप्रक्रिया, वाणी वगैरेंचा मानवी मेंदूतील नेमक्या कोणत्या भागाशी संबंध आहे आणि त्या भागांवर काय परिणाम झाले असता विचार आणि वाणी यांमध्ये काय फरक पडू शकतो यावर लुरिया, ब्रॉका यांचे संशोधन बरेच उद्‌बोधक ठरले. भाषाविज्ञानाला अतिशय घनिष्ठ संबंधाच्या - म्हणजे वाणीदोषविकाराच्या विषयात ब्रॉका प्रभृतींचे संशोधन वापरत याकोबसन यांनी जो अभ्यास केला त्यातही भाषेची ही चिह्नव्यवस्था त्यांना प्रकर्षाने जाणवली.

तसे पाहिले तर वाणीदोष विकाराचे (aphasia) सहा प्रकार होतात. त्यांना एफरंट अफेशिया, सेन्सॉरी अफेशिया, डायनॅमिक अफेशिया, ॲकरंट अफेशिया, ॲम्नेशिक अफेशिया आणि सेमँटिक अफेशिया असे म्हणतात. पण त्यांचे याहून

सर्वसाधारण वर्गीकरण करताना संवर्ग अक्षावरील किंवा चयन अक्षावरील वाणीदोष आणि संबंधन अक्षावरील वाणीदोष असे वर्ग करता येतात. त्यांचे प्रतिनिधी म्हणून Efferent आणि Sensory Aphasia यांची लक्षणे विचारात घेता येतील.

एफरंट अफेशिया ही मुख्यत: निबंधनाची (Encoding) समस्या आहे. त्यात व्याकरणिक शब्दांचा वापर नष्ट होतो. रोग्याच्या वाचाव्यवहारात बहुतांशी मूर्त नामे (concretet nouns) उरतात. ही नामेसुध्दा एकापुढे एक अशी रेखीय संबंधात येतील असे नाही. या विकाराची सर्वसामान्य स्थिती म्हणजे 'एकशब्दी वाक्य' आहे. रोग्याची वाक्यरचना उद्ध्वस्त होते. त्यात संदर्भ-रचनेची क्रिया अशक्य होते.

याउलट Sensory aphasia मध्ये फक्त व्याकरणिक शब्दच कायम राहातात. नामे, क्रियापदे, विशेषणे वगैरे नष्ट होतात. पदार्थांची, व्यक्तींची नावे लक्षात राहात नाहीत. त्यामुळे नुसते वाक्यरचनेचे नियम वापरून वाक्य तयार करणे अशक्य होते.

या दोन प्रकारांचा विचार केल्यावर असे लक्षात येते की Efferent Aphasia ही संवर्ग अक्षांवरील विकार आहे. (किंवा उलट म्हणायचे तर संबंधन अक्षावरील विकार आहे.) त्यामध्ये रोग्याला भाषणासाठी संवर्गाचे सभासद उपलब्ध असतात पण त्यांना एकमेकांशी जोडणारी वाक्यरचनेची यंत्रणा त्यांना वापरता येत नाही. दुसरीकडे Sensory aphasia चे रोगी वाक्यरचनेची यंत्रणा कदाचित वापरू शकतील पण त्यांना आवश्यक असणारी नामे, क्रियापदे त्यांना आठवत नाहीत. वाणीविकाराच्या या रोग्यांना जर झोपडीचे चित्र दाखवले तर आधी म्हटल्याप्रमाणे त्यातील काहींना प्रत्यक्ष झोपडी या शब्दाऐवजी 'घर' किंवा तत्सम, तत्संवर्गांतर्गत शब्द आठवतील आणि त्यांचा ते वापर करतील. एका दृष्टीने हा रूपकाचा वापर आहे. तर दुसऱ्या प्रकारातील रोग्यांना 'झोपडी' या शब्दाऐवजी 'दार', 'छत', 'खिडकी' असे शब्द आठवू शकतील. हे उघड उघड संबंधनाच्या अक्षावरचे चयन आहे. त्या दृष्टीने हा रूपितांगाचा वापर आहे.

यावरून निष्कर्ष काढताना याकोबसन यांना असे जाणवले की रूपकाची भापा वापरणारे हे निसर्गत: कवी असतात, तर व्याकरणशुद्ध वाक्यरचनेशी संबंधित असणारे हे साधारणपणे गद्यलेखक असतात. त्यामुळे त्यांनी असा निष्कर्ष काढला की पद्य लिहिणे ही रूपके वापरणाऱ्या कवीसाठी न्यूनतम संघर्षाची रेखा (Line of least resistance) असते तर गद्य लिहिणे ही रुपितांग वापरणाऱ्यासाठी न्यूनतम संघर्षाची रेखा असते. किंवा दुसऱ्या शब्दात सांगायचे तर गद्य लिहिणे किंवा पद्य लिहिणे हा त्या त्या लेखकाच्या इच्छेचा प्रश्न नसून त्याच्या स्वभावाच्या

जडणघडणीनुसार आढळणाऱ्या प्रवृत्तींचा आविष्कार आहे. कवी जन्मावा लागतो, तो शिकवून बनवता येत नाही. हे सत्य यापूर्वी अनेक वेळा अनेक पद्धतींनी जाणवलेच आहे. पण कादंबरीलेखक किंवा नाट्यलेखक हाही शिक्षणाने घडवता येत नाही.

(कवी काय किंवा कांदबरीलेखक काय हे दोघेही कलाकारच असतात. पूर्वी संस्कृत किंवा ग्रीकमध्ये गद्य आणि पद्य या दोन्हींनाही काव्य असे म्हणता येत असे. त्या दृष्टीने काही कवी हे रूपक वापरणारे कवी तर काही रूपितांग वापरणारे कवी असतात. रूपकशैली किंवा रूपितांग शैली अशा दोन Styles कवींना उपलब्ध असतात. त्यामुळे वामनाच्या गौडी, पांचाली, आणि वैदर्भी या रीतींची आठवण होते. या मुद्द्याचा विचार पुढे करता येईल.

अर्थात अशा पद्धतीने आणि या निष्कर्षाने Aphasia चे भाषाविज्ञानावरचे ऋण संपले तरी प्रत्यक्षात कुणीही कवी हा खऱ्या अर्थाने फक्त रूपकांचा किंवा रूपितांगाचा कवी आहे असे म्हणणे अशक्य आहे.)

पुंडलिकांनी जेव्हा या संदर्भात शैलीचा अभ्यास केला तेव्हा त्यांना असे आढळले की पद्य लिहिणे या क्रियेत व्याकरणाच्या सर्वसामान्य बंधनांना शिथिलता येत असते. त्यामुळे रूपके वापरणाऱ्या कवीला पद्यरचनेचीच नैसर्गिक उर्मी असते. पण असे असले तरी त्या शिथिलतेची मर्यादा ठरलेली असते. म्हणून पद्यकवीसुद्धा व्याकरणाचे नियम शक्यतोवर पाळतच असतात. विशेषत: पदबंधरचनेचे नियम तर जास्तच कटाक्षाने पाळले जातात. पण वाक्यरचनेचे नियम शक्यतोवर तोडणारे असे मर्ढेकरांसारखेही काही कवी असतात. पुंडलिकांचे म्हणणे असे की काव्यात रूपकांचा जास्तीत जास्त वापर करणारे कवी व्याकरणाचे नियम पाळण्याचा प्रयत्न कसोशीने करतात.[२०] शेक्स्पिअर, कालिदास, प्रख्यात फ्रेंच कवी बोदलेर, टेनिसन ही अशा रूपकप्रधान कवींची उदाहरणे होत. कालिदासाच्या बाबतीत 'उपमा कालिदासस्य' असे म्हणण्याची प्रथा आहे. वामनाने सर्व अलंकारांना उपमामूलक मानले आहे. त्याच्या शब्दात थोडा फरक करून सर्व अलंकारांना रूपकमूलक मानता येईल.

कालिदासाच्या प्रख्यात उपमांमध्ये पुढील उदाहरणे पाहा.

तस्य वंशे मनुर्नाम माननीयो मनीषिणाम् ।
आसीन्महीक्षितामाद्यः प्रणवश्छंदसामिव ॥

म्हणजे 'वेदांत ओंकार जसा प्रथम तसा सूर्याच्या वंशात मनु हा पहिला राजा होऊन गेला', या उपमेत कालीदासाने पावित्र्य, श्रेष्ठत्व आणि इतर वांछनीय गुणांचा मनूशी असलेला संबंध दाखविला.

कालिदास हिमालयाला 'देवात्मा' म्हणतो, त्याच्या दिलीपाचे खांदे शैलाच्या

खांद्यासारखे (वृषस्कंध) बळकट आहेत, नंदिनीने मायेने उत्पन्न केलेला सिंह दिलीपाला सांगतो की समोरचा देवदारू वृक्ष पार्वतीने (पुत्रीकृत) मुलगा मानलेला आहे, सुमित्रेला लक्ष्मण आणि शत्रुघ्न ही जुळी मुले झाली ज्याप्रमाणे व्यवस्थित अभ्यास केलेल्या विद्येला प्रबोध आणि विनय (ही मुले होतात). कालिदासाच्या उपमांची मोजदाद करणे हे फारच अवघड काम आहे. त्याच्या वाक्यरचनेसंबंधी काही लिहिणे हे थोडे अवघड आहे. कारण संस्कृतामध्ये व्याकरणिक रूपिमांची रेलचेल असल्याने त्यात रेखीयतेला फारसे महत्त्व नाही असे म्हटले जाते. म्हणजे संस्कृतमधील वाक्यात कोणताही शब्द कोणत्याही जागी वापरला तरी वाक्याचा अर्थ बदलत नाही असे म्हणण्याची प्रथा आहे. खरे म्हणजे ते बरोबर नाही. पण संस्कृतचे उदाहरण सोडून दिले तरी मराठीतील वाक्यरचनांचे उदाहरण घेता येते. मराठी कवीत उपमा / रूपके प्रभावीपणाने वापरण्यात कुसुमाग्रजांचा हातखंडा आहे.

चालला पुढे तो लचकत मुरडत मान
अवतरे मूर्तिमान मल्हारातिल तान
चांचल्य विजेचे दर्याचे गांभीर्य
चालला मृत्युचा मानकरीच महान

कधि वज्र धरेवर गगनातुन कडकडते
कधि गभीरेशमी पोत मध्ये जरतार
प्रमदेचे मादक वस्त्र जणू सळसळते

या उदाहरणातील रूपकांची गणना करायला नको. त्याबरोबर हेही स्पष्ट आहे की कुसुमाग्रज भाषेतील वाक्यरचनेचे नियम सहसा तोडत नाहीत. विशेषत: शेवटच्या ओळीतील 'जणू' शब्द दुर्लक्षित केला तर उरलेली ओळ गद्य लिखाणातही खपून जाईल हीच परिस्थिती

काढ सखे गळ्यातील
तुझे चांदण्याचे हात
क्षितिजाच्या पलीकडे
उभे दिवसाचे दूत

या ओळीतही थोड्याफार फरकाने आढळते.

याउलट मर्ढेकरांना वाक्यरचनेचे नियम पाळता येत नाहीत असे नव्हे. उदा

आला आषाढ श्रावण
आल्या पावसाच्या सरी
किती चातक चोचीने
प्याला वर्षाऋतु तरी

यांसारख्या ओळीत व्याकरणाचे नियम सुरक्षित (intact) वाटतात. मात्र इतर

काही कवितात मर्ढेकर व्याकरणाच्या नियमांचे काय करतात ते सर्वज्ञातच आहे.

देवळातल्या ऊद हुंगतो
गाभा भरुनी काळोखाला

यासारखी रचना करणाऱ्या मर्ढेकरांच्या काव्यात रुपितांगांची रेलचेल आढळते. उदा. **'शिळी स्तनाग्रे'**, **'हाडबंडले'** अशा बायका **'बन बांबूचे** पिवळ्या गाते.'

कोणीही कवी हा पूर्णतया रूपितांगांचा किंवा रूपकांचा कवी नसतो हे स्पष्टच आहे. रूपके वापरणारे कुसुमाग्रज रूपितांगे वापरतानाही आढळतात.

रण काय भयानक लोळे आगजळात
आदळती, वळती, आवळती क्रोधात
जणु जिंकायासी गगनाचे स्वामित्व
आषाढघनांशी झुंजे वादळवात

आणि या युद्धाची परिणती होते ती बुभुक्षित कीटकांच्या थव्यात

**ते खंड गिळाया कीटक जमले भोती**

याउलट रूपितांग वापरणारे मर्ढेकर रूपके सहज वापरतात. 'पिंपात मेले ओल्या उंदिर' 'फलाट दादा, फलाट दादा' आणि

जिथे मारते कांदेवाडी
टांग जराशी ठाकुरद्वारा

पुंडलिकांनी गोळा केलेला पुरावा सूचक आहे, पण या विषयावर अजून संशोधन होणे आवश्यक आहे. त्याखेरीज ते सर्वमान्य होणे अवघड आहे.

महत्त्वाचे म्हणजे कोणीही कवी पूर्णत: रूपकशैलीचा कवी नसतो. (अगदी Baudlaire सुद्धा) तर कोणीही पूर्ण रूपितांग - शैलीचा कवी नसतो. (अगदी मर्ढेकरसुद्धा) असे म्हणण्याचे कारण रूपके वापरणारा कवी व्याकरणिक रेखीयता वापरण्याचे नाकारू लागला तर त्याने त्याच्या काव्याला गती येऊ शकणार नाही, याउलट केवळ रूपितांगे वापरणारा कवी संवर्गांचा वापर करणार नसेल तर त्याच्या गतिमान वाहनाला वहनीय असे काही उपलब्ध होत नाही. त्यामुळे या दोन रीतींचा सुवर्णमध्य साधूनच काव्याची निर्मिती होऊ शकते.

वामनाने रीतींचा अभ्यास करताना गौडी, पांचाली, वैदर्भी यांचा उल्लेख केला होता. गौडी, वैदर्भी आणि पांचालीची त्याने दिलेली उदाहरणे मोठी लक्षणीय आहेत. विशेषत: गौडी आणि वैदर्भीची. कारण ती उदाहरणे आणि कालिदास, भवभूती वगैरेंच्या काव्याकडे ओझरती नजर टाकणाऱ्यांना सुद्धा असे लक्षात येते की गौडी रूपितांग शैली वाटते तर पांचाली रूपक शैलीला समांतर असून वैदर्भी दोन्हींचा सुवर्णमध्य आहे.

गाहन्तां महिषा निपातसलिलं श्रृंगैर्मुहुस्ताडितम्
छायाबद्धकदम्बकं मृगकुलं रोमन्थमभ्यस्यतु ॥

विश्रब्धं कुरुतां वराहततिभिर्मुस्ताक्षतिः पल्वले ।
विश्रामं लभतामिदं च शिथिलज्याबन्धमस्मद्धनुः ॥

(शाकु. २.६)

कालिदास रूपकशैलीकडे जास्त झुकणारा असल्याने तो संवर्गांतर्गत विचार जास्त करतो. त्यामुळे 'माझे धनुष्य विश्रांती घेवो' यातील रूपक अपेक्षितच आहे. पण त्याने प्राणी-जगतातील वराह, महिष, मृग यांचा उल्लेख करून रुपांगिता वापरलेली आहे हेही स्पष्ट आहे. तसे पाहिले तर शिंगांनी पाणी हलविणे, गवतांची मुळे उपटून खाणे याही रूपांगिताच आहेत.

याउलट भवभूतीच्या काव्यात रूपांगिता अपेक्षित आहे.

दोर्दण्डाञ्चितचंद्रशेखरधनुर्दण्डावभङ्गोद्यत - ।
ष्टंकारध्वनिरार्यबालचरितप्रस्तावनाडिण्डिमः ॥
द्राक्पर्यस्तकपालसम्पुटमिलद्ब्रह्मांडभाण्डोदर - ।
भ्राम्यत्पिण्डितचण्डिमा कथमहो नाद्यापि विश्राम्यति ॥

ती अर्थातच त्याने उल्लेख केलेल्या ब्रह्मांडाच्या भांड्याच्या 'उदरात' सापडतेच. शंकरांचा उल्लेख चंद्रशेखर असा करूनही रूपांगिता येते. धनुष्य मोडल्यानंतर झालेला ध्वनी हाही रूपांगितेचा प्रकार आहे. पण त्याचवेळी हा ध्वनी (आर्यबाल म्हणजे) रामाच्या भावी पराक्रमी आयुष्याचा डिंडिम आहे आणि तो अजूनही विश्रांती घेत नाही अशी दोन सुंदर रूपके भवभूती वापरतोच.

अर्थात या आणि यांसारख्या उदाहरणांमधील सर्व रूपकांचा आणि रुपितांगांचे विवेचन करणे हा माझा उद्देश नाही आणि ते मला जमेल असे वाटतही नाही. माझ्या दृष्टीने त्यातील महत्त्वाचा भाग हा की रूपकांचा सढळ वापर करणारा कालिदास रूपांगिताही वापरतो तर भवभूती रूपकांचाही वापर करतो हा आहे. पूर्णपणे गौडी किंवा पूर्णपणे पांचाली रीती वापरणे कुणालाही शक्य नाही. त्यामुळे प्रत्येकाला त्यातील मध्यम मार्ग म्हणजे वैदर्भी शैलीच वापरावी लागते. फक्त कालिदासासारखा कवी पांचालीकडे जास्त झुकतो तर भवभूतीसारखा कवी गौडीकडे जास्त झुकतो. कवी म्हणून यशस्वी होणारे हे दोघेही वैदर्भी रीतीच वापरतात असे म्हणायला प्रत्यवाय नाही.

रूपक, रूपांगिता यांचे स्वरूप आणि अर्थनिर्धारणाच्या प्रक्रियेतील त्यांचे योगदान या जटिल गोष्टी पुन्हा एकदा सोस्यूर यांच्या चिह्न, चिह्नितांच्या संकल्पनांवर स्पष्ट कराव्या लागतील, ते या निबंधाच्या पुढच्या भागात पाहाता येईल.

टिपा

१) पाहा Aphasia as a linguistic topic, Two aspects of Language and two types of aphasia disturbances, toward a linguistic

classification of aphasic impairments, Linguistic types of Aphasia -हे सर्व याकोबसन यांच्या Selected Writings II, Word and Language (Mouton, Paris, The Hague) या पुस्तकात.

२) जोनाथन कुलर यांच्या 'सोस्यूर' मध्ये उद्धृत पृ. ११४

३) केवळ तर्काच्या आधारे सोस्यूर यांनी वर्णन केलेल्या स्वरूपाचा पण तत्काली ज्ञात असणाऱ्या भाषांत उपलब्ध नसलेला एक ध्वनी नंतर ५० वर्षांनी हिटाईट या भाषेत सापडला. या संशोधनाची रोमहर्षक हकीकत युरोभारतीय भाषांच्या अभ्यासावरील अनेक पुस्तकांत मिळते.

४) हे पुस्तक तयार होण्यामागे जी सुरस आणि चमत्कारिक कथा आहे, विशेषत: संपादकांनी ज्या अडचणी आल्या त्यांचे वर्णन त्यांनी 'कुर' च्या प्रस्तावनेत केलेले आहे. ती अतिशय वाचनीय आहे.

५) ...But I am fed up with all that and with the general difficulty of writing even ten lines of good sense on linguistic matters... The utter inadequacy of current terminology... spoils my pleasure in philology... This will lead, against my will, to a book in which I shall explain why there is not a single term used in linguistics which has any meaning for me.
कुलर यांच्या पुस्तकातून उद्धृत पृ. १५. सोस्यूर यांनी हे पुस्तक कधीच लिहिले नाही.

६) लेव्ही - स्त्रोस यांनी college de France येथे प्राध्यापकाचे पद स्वीकारताना जे भाषण केले त्यात सोस्यूर यांचा गौरवपूर्वक उल्लेख केला. ते मानववंशशास्त्रालाही चिह्नविज्ञानाच्या मुशीत ओतून आकार देण्याचा प्रयत्न करतात. त्यांच्या या प्रयत्नांवर कुलर यांच्या Structuralist Poetics मधील भाष्य उपलब्ध आहे ते पाहा.

७) लाकां यांच्यावर सोस्यूर यांचे ऋण आहेच. पण सोस्यूरनी प्रभावित केलेल्या याकोबसन यांच्या रूपक रूपितांगांच्या चर्चेचेही ऋण आहे. त्यांचे विचार मुळातूनच वाचणे श्रेयस्कर आहे.

८)बार्थ यांच्या भूमिका सतत बदलत असतात. पण त्यांच्यावर असणाऱ्या सोस्यूर यांच्या प्रभावासाठी पाहा. विशेषत: Structural analysis of narratives त्यांनी स्वत: चिह्नविज्ञानावर elements de semologie या नावाचे पुस्तक लिहिलेले आहे.

९) फुको यांना संरचनावादी म्हणणे त्यांना मान्य होणार नाही. त्यांच्या अभ्यासाचा पाया अलंकारशास्त्र आणि Rhetoric हा आहे. काही वेळा ते सोस्यूर यांच्या

कल्पनांचा प्रतिवादच करताना आढळतात. उदा. But must the things said, elsewhere and by others be treated exclusively in accordance with the play of signifier and signified, as a series of themes, present more or less implicily to one another?

The birth of clinic (१९६३)

१०) देरिदा यांच्या एका प्रख्यात निबंधाचे नावच Sign, Structure and language असे आहे. त्यात त्यांनी लेव्हि-स्त्रोस यांच्या विवेचनाचाही आधार घेतलेला आहे. लेव्हि-स्त्रोस यांच्यावर असलेला सोस्यूर यांचा प्रभाव सर्वज्ञात आहे.

देरिदा यांचे सर्वोत्कृष्ट पुस्तक Of Grammatology (grammatology = science of writing) ज्या दोन प्रमुख विचारवंतांच्या संकल्पनांचा आधार घेते, त्यातील एक फ्रेंच तत्त्वज्ञ रूसो आहेत तर दुसरे अर्थातच सोस्यूर आहेत.

गंमत म्हणजे बार्थ, लाकां आणि देरिदा हे तिघेही एडगर ॲलन पो या अमेरिकन लेखकाच्या The Purloined Letter या विख्यात कथेची संरचनावादी मीमांसा वेगवेगळ्या पद्धतीने करताना आढळतात. त्यामध्ये एक महत्त्वाचा धागा चिह्निक (Signifier) या संकल्पनेत आढळतो.

११) ट्रुबेट्झकॉय यांचा Principles of Phonology हा विख्यात ग्रंथ सन १९३९ मध्ये प्रसिद्ध झाला. ट्रुबेट्झकॉय हे तर (अतिशय अभिनिवेशाने) सोस्यूर यांच्या Semiology च्या मूलतत्त्वाचे भाषिक ध्वनीमध्ये होणारे प्रकटीकरण निदर्शनास आणतात.

१२) येल्मस्लेव यांचे Prolegomena to a theory of language हे अतिशय प्रसिद्ध पुस्तक आहे. त्यांच्या मते भाषिक ध्वनींचे वर्णन करताना त्यांच्या गुणधर्मांचा विचार करण्याची गरज नाही. एका दृष्टीने सोस्यूर यांचा सिद्धांत त्याच्या टोकाला नेण्याचा हा प्रकार आहे.

१३) ब्लूमफील्ड हे १९३३ पूर्वी वैज्ञानिक रचनावादी नव्हते. पण १९३३ मध्ये त्यांनी ज्या प्रगल्भ अधिकारवाणीने रचनावादाची सूत्रे त्यांच्या 'लँग्विज्' या प्रख्यात ग्रंथात मांडली त्यामुळे अमेरिकेतील भाषावैज्ञानिकांची एक संपूर्ण पिढी यांत्रिकी, जडवादी, रचनावादाची उद्गाती झाली.

१४) ब्लूमफील्ड यांच्या रचनावादातून हद्दपार झालेल्या मानसिक प्रक्रियांना पुन्हा प्रतिष्ठा मिळवून देण्याचे कार्य नोम चॉम्स्की यांच्या 'सिंटॅक्टिक स्ट्रक्चर्स' (१९५७) आणि विशेषत: 'आस्पेक्टस् अव् दि थिअरी अव् लँग्विज' (१९६५) यांनी केले. मुख्य म्हणजे competence आणि performance या त्यांच्या संकल्पना म्हणजे सोस्यूरच्याच langue आणि Parole यांची सुधारून

वाढवलेली आवृत्ती आहेत असे म्हणता येईल.

१५) Language and the study of language आणि Life and growth of language या आपल्या पुस्तकातून विटनी यांनी भाषेच्या सामाजिकतेसंबंधी लिहिले आहे.

१६) सोस्यूर यांच्या शब्दात 'he (whitney) placed linguistics on its true axis पृ. ७६ (कुरचे इंग्रजी भाषांतर)

१७) पाहा याकोबसन, रोमां (१९६०) 'क्लोजिंग स्टेटमेंट : लिंग्विस्टिक्स अँड पोएटिक्स', टी.ए. सिबिऑक (संपादित) 'स्टाईल इन लँग्विज' (न्यूयॉर्क, द टेक्नॉलॉजी प्रेस अव एम्.आय.टी. अँड जॉन वाइली अँड सन्ज इन् - कॉर्पोरेटेड) पृष्ठ ३५०-७७.

मात्र याकोबसन यांच्या संबंधन आणि संवर्ग यांसंबंधीच्या विचारांसाठी पाहा तळटीप (१)

१८) या विषयावर झालेल्या लिखाणाची मोजदाद करणे हे अशक्यप्राय वाटते. तरीही बेर्नेदेत्तो क्रोशे, ऑगृडेन अँड रिचर्डस् (१९२४), बारफील्ड, ओएन (१९२८), मॅक्स ब्लॅक (१९४९, १९६२, १९७९) वगैरेंसारखी काही नावे नमूद करण्यासारखी आहेत.

१९) काव्य आणि भाषाविज्ञान या क्षेत्रात जाक देरिदा, स्टीव्हन डलमन, रोलां बार्थ वगैरेंसारख्यांचा प्रामुख्याने उल्लेख करायला हवा. पण विशेषत: तोदोरोव यांनी कादंबरी या विषयावर केलेले संशोधन आणि जोनाथन कुलर यांचे 'स्ट्रक्चरॅलिस्ट पोएटिक्स्' यांचा अभ्यास करणे जरूरीचे आहे.'

२०) पुंडलीक एस्.एस. (१९८९) दि रीति स्कूल अव् पोएटिक्स अँड इट्स रिलेव्हन्स टू मॉडर्न ॲप्रोचेस् टू स्टाईल, पुणे विद्यापीठाला पीएच्.डी. पदवीसाठी (सादर केलेला) अप्रकाशित प्रबंध.

पुंडलिकांचा भर काव्याच्या अभ्यासावर आहे, अर्थविज्ञानाच्या अभ्यासावर नव्हे. तसेच त्यांचे निष्कर्ष प्राथमिक अवस्थेतील आहेत. त्यांचे पुष्टीकरण होण्यासाठी अजून संशोधनाची गरज आहे.

□ □

**भाषाशिक्षण विभाग**
**एस्.एन्.डी.टी. महिला विद्यापीठ, मुंबई ४०००२०**

# सूत्रसंचालन - एक टाळणे

भारती पांडे

अनेक वर्षांपूर्वीपासूनच पुण्याला निवृत्तांचं आणि विद्यार्थ्यांचं शहर मानलं गेलं आहे. भारतभर, जगभर नोकरीच्या, उद्योगधंद्याच्या निमित्तानं फिरणारी माणसं निवृत्तीचे वेध लागायला लागले की 'पुण्यात एखादं छोटंसं घर बांधून ठेवू' असे निश्चय करायला लागतात आणि जमेल तसतसे हे निश्चय पारही पाडतात. आणि घरापासून दूर कुठेतरी शिकायला जावं लागणार असेल तर या प्रश्नाचं उत्तर 'पुण्याला' असंच असतं. त्यामुळे पुण्यात पांढरे केस-हिरवी मनं आणि खळाळती तरुणाई या दोन्ही गोष्टी अगदी गुण्यागोविंदानं नांदताना आढळायच्या.

मग हळूहळू पुणं विस्तारायला लागलं. औद्योगिकीकरणाचे फायदे तोटे शहरात जाणवायला लागले. निवृत्त आणि विद्यार्थी यांच्या जोडीनं चाकरमानी आणि उद्योजक यांचीही संख्या वाढायला लागली. आणि मग इतर अनेक गोष्टींबरोबर पुण्यातल्या स्थानिक कार्यक्रमांमधली विविधता वाढायला लागली.

तसं पाहिलं तर सभा, संमेलनं, चर्चा, वादविवाद, मेळावे, कविसंमेलनं, साहित्यचर्चा यांसारख्या कार्यक्रमांची वाण पुणे शहरातल्या रसिकाला कधीच पडली नव्हती. पुण्यातलं कोणतंही वृत्तपत्र उघडलं आणि त्यातल्या स्थानिक कार्यक्रमांच्या सदराकडे नजर टाकली की एकेका दिवशी इतके चांगले चांगले कार्यक्रम आढळतात की कोणत्या कार्यक्रमाला जावं ते ठरवणं कठीण होऊन बसतं.

आणि या कार्यक्रमांमध्ये विविधता तरी किती असावी ? 'योगवासिष्ठामधील व्याकरण' पासून 'वेताच्या मलखांबावरील कसरतीची प्रात्यक्षिके' इथपर्यंत - अगदी तुमची जी आवड असेल, जो षौक असेल तो मनसोक्त पुरा करता येईल असे, इतक्या नानापरीचे कार्यक्रम आढळून येतात हा आपला सर्वांचाच अनुभव आहे.

आता एवढं असल्यावर मग साहजिकच माणसं आपापल्या आवडीनिवडी





अनुक्रमणिका

सांभाळत आज कोणत्या कार्यक्रमाला जायचं ते ठरवणार हे ओघानंच आलं.

स्वत:च्या आवडीनिवडीबरोबरच इतरही काही महत्त्वाच्या गोष्टी तपासल्या जातात हेही कबूल करायला हवं. आपल्या अगदी आवडीचा असला तरी हा कार्यक्रम 'कुठे' आहे, 'किती वाजता' आहे, कार्यक्रम संपल्यानंतर घरी परतायला बस / रिक्षा लवकर मिळेल का, कार्यक्रमाला 'प्रवेशमूल्य' आहे की 'ऐच्छिक' आहे हे सगळं अगदी नीटपणे तपासलं जातंच, पण पुणेकर माणूस हा 'विलक्षण रसिक' म्हणूनही सुविख्यात असल्यामुळे तो वक्ते कोण कोण आहेत, अध्यक्ष कोण आहे, प्रमुख पाहुणे कोण आहेत हेही सगळं बारकाईनं पहातो आणि मग एकदाचं 'कुठे जायचं' ते निश्चित होतं. निदान आता आतापर्यंत तरी असं व्हायचं. 'आज संध्याकाळी कुठे जायचं' ते अगदी याच पद्धतीनं ठरवलं जायचं.

पण अलीकडे मात्र मला चित्र थोडं बदलल्यासारखं वाटायला लागलंय. म्हणजे होतंय काय - बाकी सगळं - अध्यक्ष, वक्ता, स्थळ, काळ (प्रवेशमूल्य) हे सगळं पूर्वीसारखंच बघितलं जातंय. पण आजकाल सूत्रसंचालक कोण आहे हेही फार काळजीपूर्वक बघितलं जातं. आवडीचा कार्यक्रम असला तरी त्याला जावं की न जावं - विशेषत: 'न जावं' हे ठरवण्याला या गोष्टीचा फार उपयोग होतो आहे असं मला अगदी उघडपणे जाणवायला लागलंय.

आता आतापर्यंत काय व्हायचं - ज्या संस्थेनं हा कार्यक्रम आयोजित केला असेल त्या संस्थेचा एखादा पदाधिकारी रीतसर सर्वांचं - वक्त्यांचं, श्रोत्यांचं स्वागत करायचा - फारतर संस्थेची थोडी माहिती सांगायचा आणि मग 'समारंभाची सर्व सूत्रे अध्यक्षांच्या हाती सोपवून 'आपण निर्धास्त व्हायचा.

अध्यक्ष महाराज ही सूत्रं हाती घ्यायचे, विषयाला धरून थोडं प्रास्ताविक करायचे आणि मग प्रमुख वक्त्यानं आपलं भाषण करावं - दोन शब्द बोलावेत - आपले विचार मांडावेत - मार्गदर्शनपर चार शब्द बोलावेत - अशा ठराविक वाक्यांनी प्रमुख पाहुण्यांना आपलं भाषण करण्याची विनंती करायचे. एकाहून अधिक वक्ते असतील तर आधी कोण बोलणार, नंतर कोण बोलणार हेही साधारणपणे अध्यक्षच ठरवीत असत. यानंतर एखादा वक्ता मुद्दा सोडून फारच भरकटायला लागला, किंवा खूपच जास्त बोलायला लागला तर मागून त्याचा सदरा खेचून खुणा करायचा अधिकारही अध्यक्षांचा असणार आणि तो ते वापरणार हेही ओघानंच यायचं. इतक्या सक्षम हातांमध्ये सूत्रं सोपवली गेल्यानंतर आणखी वेगळ्या सूत्रसंचालकाची गरज भासू नये हे योग्यच होतं.

मग हळूहळू जसजशी प्रसारमाध्यमांची चलती वाढायला लागली तसतशी 'सूत्रधार - सूत्रसंचालक' या भूमिकेची ओळख व्हायला लागली.

दूरदर्शनवरच्या अनेक वाहिन्यांवरचे पैसा-पायली रटाळ कार्यक्रम फक्त त्यांच्या

तल्लख, हजरजबाबी, चतुर 'अँकरपर्सन' मुळे लोकप्रियतेच्या शिड्या भराभर चढायला लागले. दूरदर्शनवाहिन्यांच्या जाळ्यानं आपलं सारंच जीवन करकचून आवळून टाकलं आहे, तेव्हा या दूरच्या अँकरपर्सनच्या साथीचा प्रादुर्भाव आपल्या जवळच्या सांस्कृतिक कार्यक्रमांमध्येही होणं अगदी साहजिकच होतं. आपल्या कार्यक्रमांमध्ये हे स्थान निर्माण झालं आणि त्याबरोबरच या नव्या सूत्रधाराचा नव्या सूत्रसंचालकाचा उद्‌भव झाला.

हे बाळ जेव्हा लहान होतं, नुकतं भुईतून वर यायला लागलं होतं तेव्हा खरोखरीच गुणी होतं. कधीकधी उत्कृष्ट असं सूत्रसंचालन झालेलं मी स्वत:च्या कानांनी ऐकलंय. पण हळूहळू बाळाचे पाय पाळण्याच्या बाहेर पसरायला लागले. आणि सूत्रसंचालक स्वत:ला प्रमुख वक्ता समजतो आहे की काय असा एखाद्या नवख्या श्रोत्याला संशय यावा इतकं त्याचं प्रास्ताविक - मधली जुळणी किंवा काही टिप्पणी वाढायला लागली आहेत असं दृश्य आता आपल्याला दिसतं.

सगळी सूत्रं आपल्या मुठीत घट्ट पकडून ठेवण्याचा अट्टाहास सूत्रसंचालक अतिशय हिरिरीनं करताना आता आढळायला लागला आहे. जणू काही व्यासपीठावरचे मान्यवर निमंत्रित मी कसे कळसूत्री बाहुल्यांसारखे लीलया नाचवतोय पाहा - असंच काहीसं त्याला सिद्ध करायचं असावं.

या नव्या दमाच्या सूत्रसंचालकांची आणखी एक फार वाईट खोड आहे - खरोखरच चांगलेच 'दमदार' असतात बरं हे लोक! - कितीही बोलले - बोलत राहिले तरी थकण्याचं नाव नाही! - तर 'क्ष व्यक्ती आपणा सर्वांच्या चांगल्याच परिचयाची आहे. तिची ओळख करून देण्याचं खरं म्हणजे काही कारणच नाही' असं म्हणायचं आणि लगेच त्या व्यक्तीचा पार जन्म कुठे झाला, शिक्षण कुठे झालं इथपासून सुरुवात करून चांगली हातभर लांब ओळख करून द्यायची.

ही निमंत्रित मंडळी सूत्रसंचालकाची समवयस्क असतील तर मग तो 'सुटतोच'. सभेचे उपचार खुशाल गुंडाळून ठेवून तो या निमंत्रितांशी मैत्रीपूर्ण सलगी दाखवायला सुरुवात करतो, अरे - जारे च्या भाषेत बोलायला लागतो, अजिबात विनोदी नसलेल्या 'फिरक्या' सुद्धा घ्यायला मग तो डरत नाही.

ठीक आहे - असते एखाद्याला हौस आपले 'काँटॅक्ट्स' दाखवायची - असं म्हणून आपण या गोष्टीकडे कानाडोळा करावा म्हटलं तर कधी कधी तेही शक्य होत नाही. कारण त्या निमंत्रित 'जिगरी दोस्ताची' हातभर लांबीची ओळख नीटपणी पाठ करायला वेळच मिळालेला नसतो.

एका कार्यक्रमाचे सूत्रसंचालक फार नावाजलेले होते. साहजिकच फार 'बिझी' असणार हे उघड होतं. कार्यक्रमाच्या नियोजित वेळेच्या थोडंच अगोदर ते झकपक

तयार होऊन, व्यासपीठावरच्या लखलखाटात शोभतील (कदाचित दूरदर्शनवाले आलेच 'कव्हर' करायला तर वाईट दिसू नयेत) असे कपडे करून आले. अगदी तरतरीतपणे, गोड हसू चेहऱ्यावर खेळतं ठेवून व्यासपीठावरच्या सुप्रसिद्ध प्रमुख पाहुण्याची आणि आपली कशी 'छान' दोस्ती आहे अशा अर्थाची दोन चार वाक्यं त्यांनी श्रोतृवर्गावर फेकली आणि मग त्या 'दोस्ताची' ओळख करून देण्यासाठी हातातले कागद चाळवले. नजर हातातल्या कागदावर खिळलेली, तोंडानं 'हा माझा दोस्त...' चा गजर आणि हातानं दर्शविली जाणारी व्यक्ती मात्र तिसरीच अशी गंमत उडालेली बघण्याचं भाग्य अनेकांना लाभलं. परत नावाजलेले सूत्रसंचालक - म्हणजे त्यांचा सदरा कुणी ओढायचा हाही एक प्रश्नच.

दोन वक्त्यांच्या भाषणांच्यामध्ये सूत्रसंचालकानं एक-दोन वाक्यं बोलून त्या दोन्ही भाषणांचा सांधा बेमालूम जोडून द्यावा अशी अपेक्षा निश्चितच असते. पण हे काम चांगलं कौशल्याचं आहे. त्याला थोडी अभ्यासाची गरज आहे हे आजचा सूत्रसंचालक बऱ्याच वेळा विसरून जातो असं वाटतं. मग होतं काय - पहिल्या वक्त्याच्या भाषणाचा थोडक्यात गोषवारा सांगितला जातो. जणू काही समोरचे श्रोते एकदा एखादी गोष्ट ऐकली तर समजू शकतील एवढ्या बुद्धीचे नाहीत - आणि [illegible] श्री. अमुकतमुक आपले विचार मांडतील' असं सांगून पुढच्या वक्त्याला भाषण करण्यासाठी बोलावण्यात येतं.

समारोपाचा प्रकार अर्थातच प्रहसनाच्या स्वरूपाचा असतो. सूत्रसंचालक पुन्हा एकदा सर्व व्याख्यानांची उजळणी करतो. 'हे सर्व आपलेच आहेत. त्यांचे आभार मानायचे म्हणजे घरातल्यांचे आभार मानल्यासारखं होईल' असं म्हणून पुन्हा हॉलवाला माईकवाला फूलवाला याच्यासकट सर्वांचे आभार मानतो.

त्यानं एकदा हातातला ध्वनिक्षेपक सोडला की मग मनानं थकलेले संयोजक दमल्या भागल्या पावलांनी व्यासपीठावर येतात आणि सूत्रसंचालकाचे 'मनःपूर्वक' आभार मानून त्याच्या हातात एक पाकीट सरकवून सुटकेचा निःश्वास सोडतात.

म्हणूनच तर आजकाल कार्यक्रमांच्या जाहिरातीत सूत्रसंचालकाचं नाव वाचून मगच लोक ठरवतात - न जावं असं.

□ □

३५० [illegible] को-ऑप सोसायटी, औंध पुणे ४११ ००७





अनुक्रमणिका

# भाषा हाच प्रगतीचा पाया

**दत्तो वामन पोतदार**

[श्रीमती नाथीबाई दामोदर ठाकरसी महिला विद्यापीठाच्या सुवर्ण महोत्सवाच्या निमित्ताने आयोजित केलेल्या शिक्षण सप्ताहात दि. १८ जानेवारी १९६७ रोजी दिलेले व्याख्यान.]

आता घटकाभर कल्पना करा की, ज्या प्रकारची भाषा आपण रोज वापरतो, तशी ती वापरण्याची आपली शक्ती एकदम नाहीशी झाली, तर आपली परिस्थिती काय होईल? पशु-पक्षी आणि मनुष्य यांत मग काय फरक राहील? आपले विचार आणि आपले विकार प्रकट करण्याची आपली शक्ती किती कुंठित होईल? आज आपण करतो, त्यापैकी किती व्यवहार आपल्याला चालू ठेवता येतील? आपण किती पंगू होऊ! केवढा प्रचंड गोंधळ मनुष्यसृष्टीत माजेल! सर्वत्र हाहाकार होऊन जाईल. पक्षी शब्द करतात आणि आपणही शब्द वापरतो. या दोन शब्दप्रकारांत केवढे अंतर आहे! भूक, तहान, राग, प्रीती दाखवण्याकरिता कित्येक प्रकारचे ध्वनी पशु-पक्षीही करतात. या विविध ध्वनींचा लक्षपूर्वक अभ्यास करून मोठ्या प्रयासाने काही शोधकांनी पशु-पक्ष्यांच्या भाषा थोड्याफार ओळखून काढल्या आहेत. याउलट मनुष्यप्राण्याला दिसून येणाऱ्या प्रत्येक वस्तूला एक शब्द ठरवून आणि तसेच शब्द विविध क्रियांसाठी, विविध भावनांसाठी आणि मनात उठणाऱ्या विविध कल्पनांसाठी मनुष्याने स्वत: बनविले आहेत. जगातील सर्व कुत्री-मांजरे बहुधा एकच भाषा बोलत असावी; पण माणसांप्रमाणे हरएक वस्तूला, हरएक विकाराला, आणि हरएक विचाराला किंवा कल्पनेला, नवेनवे शब्द लावून बोलण्याची जी अद्भुत शक्ती मनुष्यांमध्ये आहे, तशी ती पशूंमध्ये दिसत नाही, आणि क्वचित दिसली, तरी तिची धाव अत्यल्प आहे.

ही जी शब्दाची अद्भुत देणगी माणसाला मिळालेली आहे, तिला शोभेल अशी शब्दाच्या नित्यत्वाची उपपत्ती आपल्याकडील शास्त्रकारांनी लावलेली आहे. शंकराच्या डमरूतून चौदा सूत्रे निघाली, अशी कथा याच श्रद्धेतून उद्भवली. एकदा

नुसता 'रा' असा उच्चार केला आणि आपण थांबलो, मग 'म' असा उच्चार केला, तर हे दोन तुटक ध्वनी आपल्याला काही बोध देत नाहीत. पण 'राम' असे जोडून म्हणताच, त्या नावाच्या व्यक्तीचा बोध होतो. असे तयार झालेले शब्दसुद्धा एकटेच असले तर संपूर्ण अर्थबोध होत नाही. 'राम' म्हणण्याने रामाला हाक मारल्यासारखे होईल. 'रामराम' ही एक क्रिया होईल. राम, गोविंद, अरविंद, आंबा, पेरू, ताट, वाटी असे अनेक सुटे शब्द काही वस्तू किंवा शब्द यांचे बोधक असतात. परंतु 'राम जेवला', या दोन शब्दांनी एक संपूर्ण क्रिया दाखविली जाते. नावांचे शब्द, क्रियांचे शब्द, विचारांचे आणि कल्पनांचे शब्द असे अनेक प्रकारचे शब्द ठाकठिकीने मांडल्यावर अधिक अधिक अर्थ मिळत जातो. 'राम, रावण, मारतो' या तीन शब्दांना जवळ आणूनही अर्थ उत्पन्न होत नाही. पण 'राम रावणाला मारतो' असे म्हणताच योग्य अर्थ उत्पन्न होतो. 'राम रावणाला ठार मारतो' याने अर्थ आणखी पुढे जातो. अशा शब्दांच्या लगडी व्यवस्थेने बसवून अर्थाची पुष्कळ स्पष्टता होते. उपसर्ग, प्रत्यय वगैरे लागून अर्थ बदलतात. शब्दांची जागा बदलली, तर अर्थ बदलतो. 'राम खाली गेला' आणि 'खाली राम गेला' येथे शब्द तेच असले, तरी जागा बदल्याने अर्थ बदलतो. यालाच 'आकांक्षा', 'योग्यता', 'संनिधी' अशी नियमांची मांडणी म्हणतात.

नवे पदार्थ दिसतात, नवे शब्द येतात, नव्या क्रिया घडतात, तेव्हा त्या नव्या शब्दांनी दाखवाव्या लागतात. 'भात खाणे' आणि 'भात गिळणे' या क्रिया निराळ्या. जपानी लोक काड्यांनी उडवून भात खातात. तामीळ लोक भाताचे गोळे करून पोटात टाकतात. आपण उठतो, बसतो, खातो, पितो, आंघोळ करतो, अशा भिन्न क्रियांना भिन्न शब्द पाहिजे असतात. 'देव आहे', 'देव सर्वत्र भरला आहे', 'देव सर्वत्र भरून उरला आहे,' याचा अर्थ देव ही दिसणारी, हातात येणारी वस्तू नव्हे, डोक्यात येणारी आहे. दिसली नाही, तरी समजते किंवा उमजते. देव, दैव, सुख, दु:ख, सौंदर्य ही सारी कल्पनासृष्टी आहे. ती मनाला दिसते, समजते. मन जळते म्हणजे काय जळते ते मनालाच समजते. छाती जळजळते, ती वेदना होत असते. 'जळणे' आणि 'जळजळणे' हे दोन्ही प्रकार वेगळे आहेत. तात्पर्य, नाम-शब्द, क्रिया-शब्द, विचार-शब्द, विकार-शब्द यांना जोडणारे संबंधी शब्द, प्रत्यय, उपसर्ग अशा शब्दांचा संसार म्हणजे भाषा. या भाषेच्या आधारावरच मनुष्ये चालतात, त्यांचे व्यवहार होतात, घडामोडी समजावून देता येतात.

मनुष्यांचे निरनिराळे गट, वर्ण, वर्ग जाती या पृथ्वीतलावर वाटून वाटून वसती करून राहात आलेल्या आहेत. सर्व मनुष्यांची एक भाषा नाही, पोपटा-कावळ्यांची कदाचित असेल. पृथ्वीवर मनुष्यसंख्या अदमासे साडेतीनशे कोटी. यांच्यात निदान भल्यापैकी अशा शेपन्नास तरी भाषा आहेत. खूप विचार, कल्पना, क्रिया आणि नावे वाढवून यांपैकी कित्येक भाषा चांगल्याच पोसलेल्या आहेत. नाना युक्त्या करून

मनुष्ये आपल्या प्रदेशाबाहेर भ्रमण करीत असतात, त्यामुळे एक भाषा बोलणाऱ्या मनुष्यांचा दुसरी भाषा बोलणारांशी संबंध येतो. नव्या कल्पना, नवे विचार, नव्या वस्तू एकमेक एकमेकांना देतात आणि घेतात. बाजारात पदार्थ जसा पुडीत बांधून देतात, तसे वस्तू, विकार यांची देवाण-घेवाण शब्दांच्या पुड्या बांधून होते. शब्दांचा पोषाख केल्याशिवाय वस्तु-विचारांचा व्यवहारच संभवत नाही. देवाण-घेवाण होते तेव्हा ती शब्दांसकट होते. देवाण-घेवाण होत नाही, पण वस्तू दुरून पाहण्यात येते, तेव्हा पाहणारा, पाहिलेल्या आणि माहीत असलेल्या वस्तूचे साम्य किंवा क्रियेचे एखादे वैशिष्ट्य ध्यानात घेऊन आपल्या भाषेशी, थोडा जुळतामिळता किंवा मोडतोड करून बनवलेला असा एखादा नवाच शब्द घडवून आणतो.

कोणीतरी आगगाडी दुरून पाहिली, सहज पाहिली. त्याने बैल-घोड्यांच्या ऐवजी एक मोठे आगीचे धुराडे, गाडी ओढीत असताना पाहिले. 'आगगाडी' असा शब्द त्याने त्या वस्तूला लावला. वस्तू नवीन होती. तिची आग, धूर, ठिणग्या दुरून दिसत होत्या. असा 'आगगाडी' शब्द मराठीत सहज तयार झाला. परंतु हिंदीमध्ये 'रेल' आणि मराठीत 'रेल्वे' जास्त चालू आहे. 'पायगाडी', 'टमटमगाडी' अशा शब्दांची मराठीत अशीच भर पडली.

बाहेरून नवी वस्तू येते ती नव्या शब्दासकट येते, असे आपण पाहिले. ते शब्द जसेच्या तसेच उतरण्याची ढिलाई चालू दिली, तर रोज नव्या नव्या हजारो वस्तू, कल्पना पध्दती आपल्याकडे आणणारे त्यांच्या शब्दांनीच आपली भाषा भरून जाईल, आणि असे आज चालू आहे. मराठीत पेशवाईच्या अखेरीस इंग्रज लोकांकडे इंग्रजी वर्तमानपत्रे येत. त्याला त्या वेळच्या मराठी पत्रव्यवहारात 'न्यूसपीपर' असे म्हटले. पुढे इकडे छापखाने आले, मासिके, पत्रे निघू लागली. त्यांना प्रथम प्रथम नुसते 'पत्र'च म्हणत होते. मग 'वर्तमानपत्र' हा शब्द रूढ झाला, पण त्यापूर्वी काही दिवस 'पेपर' हा शब्द मराठीत चालू होता. लोकमान्य टिळकसुद्धा 'आमच्या पेपरात' अशी भाषा कधीमधी लिहीत; आणि आजही 'आज पेपर आला नाही', 'पेपर टाकला', अशी भाषा ऐकू येते. तसेच दारावरून रद्दी मागणारा रोज 'पेऽऽपऽर' असे म्हणताना ऐकू येते. आता 'वर्तमानपत्रा' त 'वार्तापत्रे' सुरू झाली आहेत. 'बातमीपत्रे' असाही शब्द वापरतात. तो इंग्रजीतील 'न्यूजपेपर - न्यूजलेटर' या अर्थाने. इंग्रजीतील 'पेपर' आणि 'लेटर' या दोहोंनाही मराठीत 'पत्र' हा शब्द चालतो. पण आरंभी 'पेपर' ऐवजी 'कागद' हा शब्द वापरीत असत. सांप्रत ज्यांना आपण 'संपादक' म्हणतो - आणि हा शब्द प्रथम आगरकरांनी रूढ केला अशी गोष्ट माझे वडील सांगत असत - त्यांना पूर्वी 'पत्रकर्ते महाराज' असे लेखक लिहीत. असे असतानाही केसरीतच 'एडिटर' या शब्दाचा वापर पुष्कळ झाला आहे.

मराठीत वर्तमानपत्र आल्यापासून भाषेत फारच घडामोड झाली आहे. त्यातून

दैनिक पत्रे निघाल्यापासून ती फारच वाढली आहे. छापखाने, छापील वर्तमानपत्रे, पुस्तके वगैरे सर्वच सृष्टी येथे बाहेरून नवी आली. त्यामुळे 'मशीनवर पेपर गेला', 'कंपोझिटर', 'एडिटर', 'प्रेसमन', 'प्रूफ करेक्टर', 'प्रूफ', 'ट्रेडल' 'रोटरी' वगैरे हजारो शब्द थेट मराठीत घुसले. संपादक, उपसंपादक, बातमीदार, मुद्रितशोधक असे काही मराठी शब्द तयार होऊन इंग्रजी शब्द मागे पडले. परंतु इंग्रजीची आवक एवढी मोठी आणि प्रचंड आहे की, संघटित प्रयत्न करूनही तिला आवर घालणे कठीण आहे. म्हणून बाजारात इंग्रजी शब्द गर्दी करून राहिलेले दिसतात. त्यामुळे आपण जिकडे तिकडे 'भांडारे' पाहात नाही, 'स्टोअर्स' पाहतो. 'प्रोव्हिजन स्टोअर्स' यातल्या 'प्रोव्हिजन' या शब्दाचा अर्थ कळणारे त्या बाजारात किती असतात ? स्वातंत्र्यप्राप्तीनंतर विकासाचा वेग वाढला. इंग्रजी राज्य गेले. परंतु इंग्रजी पद्धती, प्रकार, शब्द यांची आवक फारच वाढली. म्हणून वर्तमानपत्रात विशेषत: जाहिरात विभागात 'मशिनरी', 'स्पेअर पार्टस्', ऑपरेटर', 'ड्रायव्हर', 'टायर', 'ओनरशिप बेसिस', 'टर्म बेसिस', 'डिपॉझिट', 'एजंट', 'लॉजिंग-बोर्डिंग', 'गोडाऊन', 'ऑफिस', 'बाथरूम', 'शेल्फ', 'कॉट', 'सोसायटी', 'सेक्रेटरी', 'ब्लॉक', 'बिल', 'रिसिट', 'स्टॅम्प' असे शेकडो शब्द तर घरातल्यासारखे वावरतात. मुले, 'रेडी' 'आऊट' याची गर्दीच करतात. पूर्वीच्या मराठीत सोंगट्या 'मरत' होत्या, आणि खेळगडीही 'मरत' होते. आता 'आऊट' होतात. तेव्हा मला मराठी भाषाच 'आऊट' होते असे वाटते. पायगाडीचे चाक आता ढळत नाही, तर आऊटच होते. असा दशदिशांनी विदेशी आणि विभाषी शब्दांचा साखसुरत प्रवेश मराठीत होत आहे. त्याला बंध घालण्याचा उद्योग होतो, तेव्हा वृत्तपत्रकर्ते हे 'रन' ला मागे टाकून 'धाव' ला पुढे आणतात. आणि राज्यकर्ते 'सेक्रेटरियट' चे 'सचिवालय' करतात. परवा एका गाडीहाक्याने माझ्या तोंडून 'नवे सेक्रेटरियट' शब्द बाहेर पडताच भांबावल्यासारखे करून 'सचिवालय बोलो ना' असे मलाच खडसावले. असे नवे शब्द सहज रूढ होऊ शकतात. पण जाणीवपूर्वक प्रयत्न व्हावे तितके होत नाहीत. म्हणून 'फ्रॉक', 'बॉडिस्' 'शर्ट', 'कोट', 'टाय', 'पँट', 'बुशशर्ट', 'हाफपँट', अशी शेकडो मंडळी लीलेने अंगावर चढून बसली आहेत. मग 'कोर्ट', 'अपील','बेलीफ', 'ड्रायव्हर', 'डॉक्टर', 'कंपाऊंडर' अशा मित्रांच्या भेटीला सुमार नाही. 'प्लीज', आणि 'थँक्स' मुरकत, लचकत लाडिकपणे पुढे जातात. 'आभार', 'धन्यवाद' ही मंडळी अजून गावठीच वाटतात. 'बल्ब', 'स्विच', 'कॉक', किती म्हणून सांगावे ? नावे घेताना शेष थकून जाईल. आता खेडुतसुद्धा 'बस' मधून जातात. 'स्टँड' वर उभे राहतात, 'कंडक्टर' शी भांडतात, असा कहर सांगता पुरवत नाही.

इकडे तर आपण भाषिक राज्ये केली आहेत. प्रादेशिक भाषेतून कारभार चालावा म्हणून कायदा केला आहे. भाषा-विकास मंडळे चालविली आहेत. उत्तेजन,

पारितोषिके, स्पर्धा घडवून आणीत आहोत, तरीही अजून 'हाऊसफुल्लच' आहेत. मधूनमधून 'उच्चांक' मोडतात. याचा अर्थ, अजून नीट वळण लागले नाही, कुणी लावीत नाही. आपल्याला आपणच घोषित केलेली लोकशाही समर्थ आणि पुष्ट करावयाची आहे. आपण मराठीत पूर्वी भक्तीचे मळे पिकविले आहेत, शौर्य, शृंगार, यांचे थाट चालवले आहेत.

पूर्वी मुसलमान काळात त्यांच्या संगतीने 'अर्ज-विनंती', 'बाजार-हाट', 'जमीन-जुमला', 'बादशहा-बेगम' असे पुष्कळ शब्द मराठीत आले, वसतीला राहिले, मग घरात राहिले, कुटुंबीय झाले, तथापि प्रचंड आवक करण्याइतकी नवी सृष्टी मुसलमानांजवळ नव्हती. परंतु इंग्रजी आधुनिक युगाला घेऊन आली. आधुनिक युगाचा वेग आणि झपाटा दिसला, तसा पूर्वी कधीच कोणी पाहिला नव्हता. या झपाट्याने देशी भाषांचे मंडळ हादरून गेले. इंग्रजीची प्रभा इतकी विलक्षण, आकर्षक आणि उपयुक्त दिसू लागली की, या नव्या छत्राखाली नांदल्यानेच आपला उद्धार होईल, आजवर आपण फसलो, आता नवे जीवन, नवे ज्ञान, नवी शास्त्रे, यांच्या आधाराने, इंग्रजांच्या आणि इंग्रजीच्या पुढाराखाली सुखाने प्रगतीची वाटचाल करावी, असे आमचे ठाम निर्णय होऊ लागले. बुद्धीच पार पालटून जाऊ लागली. आता इंग्रजी हीच आपल्या जीवनाची खरी भ[illegible] अशी नवी भक्ती उदयास आली. अखेर अनुभव आला की, इंग्रज परका तो परकाच. आपली उन्नती आपणच करून घेतली पाहिजे. आपल्याच भाषा आपण वाढवल्या पाहिजेत. आपले मार्ग, आपली घरे आपणच बांधली पाहिजेत. आपल्या स्वराज्यातच आपल्याला नांदले पाहिजे पण हे स्वराज्य म्हणजे जुने स्वराज्य नव्हे, नवे स्वराज्य, आधुनिक स्वराज्य, हिंदवी स्वराज्य. त्याचे कर्ते-धर्ते आपणच. म्हणून आपण इंग्रजांना घालवले आणि स्वराज्य उभे करण्याच्या पावित्र्यात जगासमोर उभे राहिलो. पूर्वीचे चांगले असेल ते ठेवू, नवीन आनंदाने घेऊ, नवीन स्वत: वाढवू, असे करू तेव्हाच खरे नवे स्वराज्य आणि खरी त्याची प्रतिष्ठा आपल्याला लाभेल.

आणि या उद्योगात नुसती नक्कल करून भागणार नाही. आपली अस्सल नाणी आपण पाडली पाहिजेत. याचाच अर्थ असा की, नव्या युगाचे विशाल ओझे आपल्या डोक्यावर पेलू शकेल इतके सामर्थ्य आपल्या देशी भाषांच्या अंगी येईल, असा उद्योग केला पाहिजे. पृथ्वीवरील सर्व जुन्या-नव्या शास्त्रांचा भरपूर आणि कसदार व्यायाम देशी भाषांना घडवला पाहिजे. जगाच्या आखाड्यात मैदान मारण्याची हिंमत त्यांच्या ठिकाणी उत्पन्न केली पाहिजे. आपल्यापाशी संस्कृतचा खुराक भरपूर आहे. उणीव आहे ती मेहनतीची. तेवढी भरून काढण्याचे 'श्रेष्ठ धारिष्ट' आपण 'जीवी' धरले पाहिजे. जगात सर्वांनी तेच केले आहे. आपला पूर्वेकडील भाऊ जपान याने आपले शब्द - शरीर असेच कमावले आहे. पोकळ आणि दिखावू फोफशेपणाच्या



अनुक्रमणिका

नादी आपण लागता कामा नये. दशदिशांनी येणारे ज्ञान तेवढे आत घेऊन, त्याच्याबरोबर येणारा विदेशी शब्दांचा पसारा आणि परिवार आपण परतवून लावला पाहिजे. ज्ञानदेवतेला आपल्या तपश्चर्येने आणि भक्तिबळाने प्रसन्न करून घेतले पाहिजे. तिला मराठीचा पोषाख अर्पण करून सजविली पाहिजे. आपल्या हृदयातून बाहेर पडणाऱ्या शब्दपुष्पांनी तिची आरती केली पाहिजे. सर्वत्र आत्मा जसा एक, तसे ज्ञान एक, पण ध्याने भिन्न भिन्न असतात. आपले ज्ञानाचे ध्यान आपलेसे आपणाला वाटले पाहिजे. आपले राष्ट्र निराळे, तर आपले निशाण निराळे. आपली विमाने, आपल्या आगगाड्या, आपल्या फौजा, यांना ज्याप्रमाणे आपले आकार, आपली चिन्हे आपण लेववितो, तशी आपल्या भाषेच्या प्रकृतीतून निघालेली नावे त्यास दिली पाहिजेत. आपले जहाज जहाजासारखेच असेल पण नाव पाहिजे, 'यमुना'. विमान विमानासारखे असेल, पण नाव पाहिजे, 'मेघदूत'. असा भाषिक कटाक्ष जीवनाच्या सर्व प्रदेशात चालला पाहिजे. म्हणजे तो समस्त जनतेच्या सहज पचनी पडेल. मग आपल्या भाषांतून सहस्त्र मुखांनी शास्त्रांचे प्रवाह वाहू लागतील, आणि ते जगाच्या ज्ञानसागराला मिळतील.

जिवंत प्राजक्तावर हजारो सुवासिक फुले उमलून जेव्हा फुलांचा सडा पडतो, तेव्हा सारा आसमंत सुवासाने दरवळून जातो. ही फुले झाडाला यावी लागतात. बाहेरची फुले आणून काटक्यांच्या झाडावर बसवून अशी दरवळ येणार नाही. आंबा मोहरून जेव्हा अंगच्या फळाने डवरून जातो, तेव्हाच तो रूप-रस-गंधाने आपल्याला तृप्त करतो. बाहेरून जरी बी आणले, तरी त्याची लागवड आपल्याला जमिनीत करावी लागते, तेव्हाच घरची फुले, घरची फळे, घरची धान्ये चाखायला मिळतात. मनासारखे प्रयोग करता येतात. समाधानाने आणि प्रतिष्ठेतेने राहता येते, खरे 'भक्तिसुख', मिळते, खरी प्रगती होते, खरी लोकशाही नांदते, खऱ्या राष्ट्रपणाची कांती अंगावर चढते!!

ज्ञानाचा सारा खेळ शब्दांच्या आश्रयाने कसा होतो, हे मागे विशद केले आहे. आपल्या भाषेतील शिक्क्यांची शब्दांची नाणी पाडून, आपल्या प्रभावाने जगाच्या स्पर्धेच्या बाजारात आपली किंमत तगवायची असेल, तर आपल्या भाषेचे नाणे आपण स्थिर केले पाहिजे. 'भाषा हाच प्रगतीचा पाया आहे' हे काय आता निराळे सांगावयास पाहिजे?

□□

**[श्रीमती नाथीबाई दामोदर ठाकरसी महिलाविद्यापीठाचा सुवर्ण महोत्सवी ग्रंथ. ८ मार्च १९६८. खंड दुसरा - लेख आणि भाषणे. संस्कृत-मराठी विभाग. पृ ३-९ मधून सौजन्याने.]**

# मधाच्या घागरीच्या निमित्ताने

लीला अर्जुनवाडकर

[बालमुकुंद संस्कृत विद्यालयाच्या ग्रंथालयात शेल्फावरती पुस्तके चाळत होते. आणि अगदी अनपेक्षित अशा एका शीर्षकाने माझे लक्ष वेधून घेतले. 'मधाच्या घागरी (मादिशो घागरी - सामवेदी बोलीभाषेतील लोकगीते).' लगेच ते पुस्तक मी घरी आणले आणि वाचायला सुरुवात केली. या पुस्तकाने अनेक अंगांनी माझी उत्सुकता चाळवली. हे पुस्तक वाचताना सतत वाटत राहिले की आपण यांचा परिचय 'भाषा आणि जीवन' च्या वाचकांना करून दिलाच पाहिजे.]

या संग्रहाचे संकलक संपादक आहेत - फा. फ्रान्सिस कोरिया, पॉल रुमाव आणि बावतीस दाबरे या तिघांनीही पुष्कळ कष्ट करून हे 'अपौरुषेय वाङ्मय', ही ७३ स्त्रीगीते गोळा केली आहेत व अंगाईगीते, बडबडगीते, भक्तिगीते, विवाहगीते आणि सांस्कृतिक गीते (आधीच्या चारही गटात न बसू शकणारी) अशा पाच विभागांत ती मांडली आहेत. या पुस्तकाच्या सुरुवातीला दिलेल्या मनोगताचे नाव आहे 'मंडपाच्या पुढल्या दारी.' नंतरची आस्वादक प्रस्तावना (सामवेदी लोकगीतांतील सांस्कृतिक ठेवा) लिहिली आहे श्रीमती शिरीष पै यांनी. त्यानंतरच्या छोट्याशा निबंधात संपादकांनी 'ओळख लोकगीतांची' करून दिली आहे. नंतर वर सांगितलेल्या विभागक्रमाने गीते दिली आहेत. त्यातही प्रत्येक गीताची ससंदर्भ ओळख, भावार्थ, प्रत्यक्ष गीत व अपरिचित शब्दांचा अर्थ दिला आहे आणि सर्वांत शेवटी 'तोडियता तोरण' नावाच्या लेखात या सर्व गीतांत प्रतिबिंबित झालेली लोकसंस्कृती, आचार, जीवन, भाषा यांत सध्या झालेला व घडत असलेला बदल यांचे विवेचन केले आहे. हा बदल प्रचंड असला तरी संपादकांच्या मतानुसार या गीतांचा आत्मा अबाधित आहे. ते बहुधा त्यांतील भावविश्वाच्या अनुरोधाने असावे. काहीशा भावुक शैलीने लिहिलेल्या या लेखांत संपादकांनी 'आपला प्रयत्न अगदी बालबोध प्राथमिक व प्रायोगिक स्वरूपाचा आहे' अशी प्रांजळ कबुली दिली आहे. मात्र लोकसाहित्याच्या अभ्यासकांना

'मूलगामी व मूलग्राही संशोधना' साठी जो 'कच्चा माल' लागेल तो येथे पुरेशा प्रमाणात सुसंगतपणे रचला असल्याचा दावा केला आहे. तो मान्य करता येईल.

या पुस्तकातील माहितीनुसार हा सामवेदी समाज वसईच्या हरित उत्तर किनारपट्टीत पूर्वापार वास्तव्य करून आहे. हा सामवेदी समाज व्यवसायाने पिढीजात गायक होता. वैदिक काळापासून होमहवनाच्या वेळी गायन करणारा हा वर्ग. परंतु या गीतांत प्रतिबिंबित झालेले वातावरण बहुतांशी ख्रिश्चन आहे. मुखपृष्ठावरील चित्रांतील स्त्रियांच्या कपाळी कुंकू नाही. ख्रिस्त, चर्च, मारिया, मिस्सा, धर्मपिता, धर्ममाता, दहा आज्ञा, रमेदायमावली, चर्चमधील लग्नविधी, वसई किनारपट्टीतील ख्रिश्चन तीर्थक्षेत्रे असे अनेक ख्रिश्चन पिंडाचे संदर्भ यात आले आहेत.

श्रीविष्णू, रेणुका, शंकरपार्वती, कुरुशव (= कृष्ण), सीता-परित्याग, लक्शीमन (= लक्ष्मण), विठोबाची पालखी, गंगा, पांडव, वैतरणी, कळीचा नारद, इंद्राच्या रंबा, नंदाकूळ असे खास हिंदू संदर्भ गीतांत आहेत, नाही असे नाही. बावीसावे गीत तर अथपासून इतीपर्यंत कोणत्याही हिंदू नित्यपाठात, भक्तिपाठात बसण्यासारखे आहे. ते वाचताना तुकारामाच्या 'पहिली माझी ओवी....' या रचनेचीच आठवण होते. एका ठिकाणी चैत्र, वैशाख अशी महिन्यांची सर्व जुनी नावे आली आहेत.

एखाद्या समाजाने इतिहासाच्या एखाद्या काळात जुना धर्म सोडून नव्या धर्माचा स्वीकार केला, तरीही श्रद्धा व संस्कार यांच्या पोटी जुन्या धर्माचे अवशेष राहतातच. जुन्या नव्याचा एक नवा मेळ त्यातून जन्माला आलेला दिसतो. कारण पूर्ण बौद्धिक व तार्किक पातळीवर कोणत्याही धर्माचा स्वीकार अगर त्याग होत नसतो. हेच या संदर्भांवरून दिसते.

पण तरीही या गीतांतील वातावरण प्राधान्यत: ख्रिश्चन आहे. त्यामुळे 'सामवेदी' या शब्दाचा जो अर्थ संपादकांनी घेतला आहे, तो यथार्थ आहे का अशी शंका मनात येते. या समाजाच्या 'सामवेदी' या नावाचा इतिहास किती जुना आहे ते कळत नाही. त्यामुळे असे वाटते की 'सामवेदी' या नावाचा 'सामवेद' या वेदाशी संबंध जोडण्यापेक्षा ख्रिश्चन परंपरेतील Psalm' या शब्दांशी जोडावा. Psalm चे स्पष्टीकरण वेब्स्टरच्या कोशात असे दिले आहे - 'A Sacred song or poem used in the praise or worship of the deity - especially one of the biblical Rymns collected in the book of Psalms.' ही Psalms जाणणारे (= वेदी) ते 'सामवेदी' असा अर्थ करणे शक्य आहे.

या गीतांच्या प्रत्यक्ष गेय स्वरूपाचा अभ्यास केल्यास ते वैदिक सामगानाशी मिळतेजुळते आहे की ख्रिश्चन Psalm गायनाशी मिळतेजुळते आहे याचा व त्यावरून 'सामवेदी' या नावाचा कदाचित उलगडा होऊ शकेल. अर्थात सामवेदगायनाचे मूळचे स्वरूप आज किती शिल्लक राहिले आहे, हा प्रश्न आहेच.

शिवाय सामवेदाच्या पुष्कळ शाखा फार पूर्वीच लुप्त झाल्या होत्या. मूळ 'सहस्रवर्त्मा' असणाऱ्या सामवेदाचे अस्तित्व आता जेमतेम तीन शाखांपुरतेच शिल्लक राहिले आहे. महाराष्ट्रात राणायनीय शाखा प्रचलित होती किंवा काही प्रमाणात आहे, हे खरे; पण वसई ते गोवा या किनारपट्टीत साधारण सोळाव्या शतकापासून पोर्तुगीज अंमल आला. तेव्हापासून सक्तीची बाटवाबाटवी फार मोठ्या प्रमाणात झाली. त्यामुळे मूळ भाषा जरी सर्वसामान्यपणे कोकणीच (तिचीही वेगवेगळी रूपे वसईपासून उत्तर कर्नाटक जिल्ह्यात आढळतात.) राहिली तरी ख्रिश्चन धर्माचे प्राबल्य झाल्यामुळे आधीच लुप्तप्राय झालेला सामवेद वसईच्या आसपास आणि तोही ग्रामीण बहुजनसमाज या वर्गांत राहिला असेल असे वाटत नाही.

सांस्कृतिक दृष्ट्या पाहिले तर या गीतांत जीवनाचे खूपच तपशील मिळतात. कुटुंब, नातेसंबंध, आचार भाषा, आजूबाजूचा निसर्ग व्यावसायिक अशांबद्दलचे अनेक तपशील यांत मिळतात.

कौटुंबिक नातेसंबंधांत बहीणभाऊ, पतिपत्नी, मायलेक, प्रियकरप्रेयसी, वधूवर-वऱ्हाडी, मामा-मामी, मावशी-भाची, मामा-भाची, नणंद-भावजय, आजोबा-आजी-नातवंड, सावत्रपणा असे अनेक उल्लेख आढळतात. त्यांत प्रेमाचे, गोडव्याचे वात्सल्याचे आपुलकीचे संबंध जसे आहेत तसे वैराचे भांडणाचेही आहेत. खेळकरपणाची थट्टामस्करी आहे तशी टोमणेबाजी, उणेदुणे काढण्याची प्रवृत्ती पण आहे. कजाग सावत्र सासू सुनेला 'गंगे' म्हणते आणि 'तुला चिरून टाकीन, जसा सुरण भाजीसाठी तासला जातो तसा माझ्या सावत्रपुत्राला तासून टाकीन' अशी धमकी देते. एरवी सुनेला 'ऑबाय' आणि मुलीला 'दुहे' म्हटले जाते.

शेवंती, जाई,जुई, झेंडू, नागचाफा, केतकी, मोगरा, दवणा, कमळ, गुलछडी या फुलांचा व त्यांच्या घमघमाटाचा संदर्भ या गीतांत पुष्कळ आला आहे. त्याबरोबरच 'झेंडूफळ', 'भरदावेली' व 'बेलफुले' यांचेही आपल्याला न उलगडणारे उल्लेख आहेत. कडुनिंब, उंबर, फणस, वड, पिंपळ, करंज, बेल हे वृक्ष या गीतांत भेटतात. नारळ आणि आंबा यांचा शुभ म्हणून संदर्भ आहेच. पण लग्नविधीत अनेक संदर्भांत महत्त्वाची ठरणारी 'रुई' देखील यात आहे. 'आंब्याच्या झाडाखाली खेळणाऱ्या बाळ येशूने आपले दैवी रूप प्रकट करताच कापुराच्या झाडाला नारळ लागले. जेरुझालेम शहरात पिकलेली बोरे दिसू लागली. इतकेच काय, तर प्रभूचे नाव घेताच सर्व झाडे सुवर्णमय झाली' अशीही मनोरंजक माहिती यात मिळते. दूरवरच्या सोन्याच्या लंकेचाही उल्लेख एका गीतांत आहे.

व्यावसायिकांत किती 'मिस्तेऱ्यां'ची (कारागिरांची) नावे यावीत? तायीया (= कोष्टी), मालोये (= न्हावी), सोनार, टाकेकरी, बुरूड, माळी, कुळंबी (= शेतकरी), गोवारी, सुतार यांच्या जोडीला 'गोंडारी (= गोंडे बांधणारा.

पटवेकरी?), कातारी आणि काशीच्या पवित्र भूमीतून आलेले 'मिनार' (= चुडे चढवणारे) यांचाही उल्लेख आहे.

या सामवेदी भाषेत नेहमीच्या स्वरांच्या जोडीला 'अॅ' आणि 'ऑ' हे स्वर आहेत, असे 'U' या चिन्हावरून दिसते. उदा. - तॉंड (= तोंड) आरॅ आरॅ (= अरे अरे). ध्वनिविकृतीत मराठीतील च् - चा स् किंवा श् होण्याची प्रवृत्ती विशेष दिसते. उदा. - चतुर = सतुर, चूल = सूल, चैत्र = सइत्र, आंब्याची = आंब्याशी, जावयाची = जावयाशी. स् - चा ह् झालेला दिसतो. उदा. - सुकाळ = हुकाळ. सूप = हुपडा

विभक्तिप्रत्ययांत 'न' हा तृतीयेचा प्रत्यय आहे. तर षष्ठीचे संस्कृत 'स्य' शी जुळणारे शॅ शे से सा असे प्रत्यय आहेत.

या गीतांत प्रसंगपरत्वे उल्लेखिले गेलेले खाद्य पदार्थ असे आहेत. वडे, सांदणे, बारक्या कोळम तांदुळाचा भात, नागली, मसूर डाळीचे वरण, खजूर, तळण आणि दारू. नवाळे, अंगठीतोड (तोड = ऐवज), मुगड्यातोड (कानातला दागिना - बुगड्या?) काशीतोड (पायातला दागिना), गळसरी, दुल्लड (दूड?), कमरेचा गोफ, बांगड्या, तोडे, वाळे, बिलोरी, बांगड्या हा या गीतांतला जव्हेरीबाजार.

पण आपल्याला सगळ्यात चक्रावून टाकते ती या गीतांतली शब्दसंपत्ती. यांतील शब्द संस्कृत, इंग्रजी व पोर्तुगीज या तीनही भाषांतून आलेले आहेत. त्यांना आपण तद्भव म्हणू. उदा. बीदी < वीथी. दुहा < दुहिता. पाटोळी < पटोल. विजनॅ < वीजन. आल्तार < आल्टर. सांतामरी < सेंट मेरी, रमेदाय < रेमिडी, अतिता < अतिथी. बोव < बहु.

पण देश्य (म्हणजे माझ्या ज्ञानाच्या मर्यादित देश्य. कदाचित अन्य कोकणी बोलीत हे शब्द असतीलही. तसे पाहिले तर शब्दांच्या अशा वर्गीकरणाने नक्की काय व किती हाती लागते? एखादा शब्द ज्ञाताच्या एका बिंदूपासून उचलून दुसऱ्या बिंदूपाशी नेऊन ठेवायचा एवढाच या खटाटोपाचा अर्थ. त्यामुळे आजकाल कोशांत व्युत्पत्त्या फारशा दिल्या जात नाहीत, असे एका जाणकारांकडून कळले.) शब्द मात्र उदंड आहेत. उदा. पोंदी (= पोट), सुडाळ (= पु.शि. रेग्यांचा आवडता शब्द. सुढाळ), बलाडी (= मांजर बिडाल?), गजप (= कळप), जेजू (= घरधनी), नाऊळी (= वरात), संदरीक (= पवित्र), कद्यारे (= खुर्च्या), भिकनी (= ढेकणांनी भरलेली), आदोडी (=इकडे), मादोडी (= तिकडे), मुरुड (= कुरळे), कुंडाफिनी (= आरसाफणी), अळशी (= वेलची), निसनी (= शिडी), गॉळॅ (= चुंबन), ओंड्यो (= खोल), रोजमोर (= सुगंधी फुले, रोजमेरी?).

ही सर्व उदाहरणे केवळ वानगीदाखल दिली. भाषेचा अभ्यास करू इच्छिणाऱ्याला शब्दसंपत्ती, व्याकरण अशा सर्व दृष्टींनी समृद्ध सामग्री या गीतांत

मिळेल. अर्थात हेही खरेच की भोवतालचे आयुष्य, सांस्कृतिक अनुबंध हे जसे झपाट्याने पालटत आहेत, त्याचप्रमाणे यातील बोलीभाषाही फार वेगाने पालटत आहे. शुद्ध मराठीच्या (खरे तर, शुद्ध मराठी तरी आता किती राहिली आहे?) प्रभावाखाली येऊ लागली आहे, असे शेवटच्या निबंधात म्हटले आहे. तसे पाहिले तर वर्तमानपत्रे, चित्रपट व दूरदर्शन यांच्या रेट्यामुळे एकूणच बोलीभाषा लुप्त होऊ लागल्या आहेत. कुणी जात्यात तर कुणी सुपात एवढाच फरक.

या पुस्तकात लेखनातली अशुद्धे बरीच राहिली आहेत. पण संपादकांनी 'मंडपाच्या पुढल्या दारी' पासून 'तोडियता तोरण' पर्यंत हा लग्नमंडप जो सजवला आहे तो खरोखर मन वेधून घेणारा आहे.

(मधाच्या घागरी : संपादक फा. फ्रान्सिस कोरिया, श्री. पॉल रुमाव, श्री. बावतीस दाबरे, प्रकाशक : पॉल रुमाव, इतिहास-संस्कृती मंडळ, वसई, सप्तर्षि प्रकाशन, सेंट जॉन चर्च, ८ गोवा स्ट्रीट, मुंबई ४००००१, मूल्य रु. ४० पृष्ठे १२ + १७७

□ □

देवांगिनी, ११९२ शुक्रवार पुणे ४११००२ दूरभाष ४७९४१९

**वसई तालुक्यातील सामवेदी ब्राह्मण**

१२ एप्रिल ९७ च्या 'महाराष्ट्र टाईम्स'च्या अंकामध्ये 'जातपंचायत' या सदरात प्रसिद्ध झालेल्या अरुण साधू यांच्या 'महाराष्ट्रातील देशस्थ ब्राह्मण' या लेखामध्ये, सामवेदी, अथर्ववेदी शाखा महाराष्ट्रात आढळत नाहीत, असा उल्लेख करण्यात आला आहे. मात्र वस्तुस्थिती वेगळी आहे.

मुंबईपासून अगदी हाकेच्या अंतरावर वसई तालुक्यामध्ये सामवेदी ब्राह्मणांची वस्ती आहे. अगदी रामायण पूर्वकाळापासून शिलाहार राज्याच्या अंतकाळापर्यंत सर्वच ब्राह्मण सामवेदी होते.

वसई तालुक्याच्या पश्चिम पट्ट्यात जवळजवळ शंभर ते दीडशे चौरस मैलाच्या परिसरात २० हजार लोकसंख्या सामवेदी ब्राह्मणांची आहे. हा समाज राणायणीय शाखेचा आहे. राणायणीय शाखेचे आचार्य राणायण ऋषी हे सोपारा परिसरात वास्तव्यास होते असे म्हटले जाते. या समाजाची नित्यांजनी किंवा नित्यांजन ही राणायणीय शाखेच्या अंतर्गतच असलेली एक विशेष उपशाखा आहे. ते जैमुनी वंशविस्तारसुद्धा समजले जातात. पं. महादेवशास्त्री (दिवेकरांच्या मते रामायणपूर्व काळात परशुराम समयीसुद्धा सोपारा परिसरात सामवेदी ब्राह्मण कार्यरत होते व परशुरामाच्या मातोश्रीच्या उत्तरक्रियेसाठी त्यांनी पौरोहित्य केले.

या समाजात कौशिक, भार्गव, काश्यप, भारद्वाज, अत्री, वसिष्ठ व अंगीरस अशी सात ऋषिगोत्रे आहेत. त्यांची नाईक, पाटील, जोशी, वर्तक, म्हात्रे अशी आडनावे आहेत. या समाजात सगोत्र विवाह सहसा होत नाहीत. तसेच या समाजाची विशिष्ट बोली - भाषा आहे.पूर्वीपासून शेती हा प्रमुख व्यवसाय आहे.

पोर्तुगीज काळात सुमारे सोळा हजार सामवेदी बाटून ख्रिश्चन झाले. त्यांचा आजही सामवेदी ख्रिश्चन असा उल्लेख केला जातो. त्यांची आणि सामवेदी ब्राम्हणांची बोलीभाषा जवळजवळ सारखीच आहे. नागपूरमध्येसुद्धा सामवेदी ब्राह्मणांची संख्या मोठ्या प्रमाणावर आहे. म्हणजे महाराष्ट्रात इतरत्रही सामवेदी ब्राह्मण असू शकतात असे म्हणायला हरकत नाही.

**राजीव नाईक, बोळींज, विरार**

(महाराष्ट्र टाइम्स दि. २६ एप्रिल १९९७ मधून)

**आणखी खुलासा**

म.टा. च्या २६ एप्रिल १९९७ च्या अंकातील वरील पत्र वाचल्यानंतर या संदर्भात डॉ.चिं.ग. काशीकर यांच्याशी माझे बोलणे झाले. त्यांनी पुढील माहिती दिली - "या विषयावर काही वर्षांपूर्वी टिळक विद्यापीठात व्याख्यान झाले होते. आणि म.टा. मधील पत्रातील '१६००० सामवेदी' हा उल्लेख वाच्यार्थाने प्रमाण मानला नाही, तरी ही घटना खरी असावी. कारण वसईकडील हा भाग गुजरातला जवळ येतो व गुजरातमध्ये आजही कौथुम शाखेच्या सामवेदी लोकांचे प्रमाण बऱ्यापैकी आहे. मात्र हे खरे की या संदर्भात प्रत्यक्ष हिंडून माहितीचे संकलन करणे व त्यावरून निष्कर्ष काढणे हे अत्यावश्यक आहे."

**लीला अर्जुनवाडकर**

---

## स्वभाषा आणि परकीय शब्द

भाषेत परकीय शब्द नसणे हे स्वाभिमानाचे लक्षण आहे खरे, पण त्याचा अर्थ असा की, परकीय शब्दांचा स्वदेशी शब्दांवर शिरजोरपणा होऊ नये. परकीय शब्द मुळीच स्वभाषेत असू नयेत, असा नव्हे.

**— लोकमान्य टिळक**

□





अनुक्रमणिका

# धर्मजीवन आणि मातृभाषा

लक्ष्मण लोंढे

अलीकडेच आगाशीच्या एका ख्रिस्ती मित्राच्या मुलाच्या बाप्तिस्म्याच्या विधीला जायचा योग आला.

विधी गावातल्या चर्चमध्ये संपन्न झाला. नवजात बालकाचे आई-वडील, मानलेले आई-वडील, धर्मगुरू, जवळचे नातेवाईक आणि निवडक मित्रमंडळी एवढीच माणसं समारंभाला हजर होती. चर्चच्या प्रार्थनाहॉलमध्ये प्रवेश केल्यानंतर काही सामुदायिक प्रार्थना, मग मुलाला धर्मवेदीपाशी घेऊन जाणं, तिथे त्या मुलाच्या भावी जीवनातील आध्यात्मिक जीवनाच्या संदर्भात आई-वडील व मानलेले आई-वडील यांची कर्तव्ये कोणती याबद्दल धर्मगुरूंनी केलेला उपदेश, पवित्र पाणी वगैरे शिंपडण्याचा केलेला उपचार आणि नंतर त्याला धर्मगुरूंनी दिलेला आशीर्वाद अशा प्रकारचा हा समारंभ होता. त्यानंतर त्या महत्त्वाच्या संस्काराबद्दल आनंद व्यक्त करण्यासाठी पार्टी होती ती त्या मित्राच्या घरी होती. त्यात धर्माचा काही संबंध नव्हता.

प्रथम केलेल्या सामुदायिक प्रार्थनेपासून ते धर्मगुरूंनी केलेल्या उपदेशापर्यंत हा सर्व विधी संपूर्णपणे मराठीत होता. त्यामुळे चर्चमध्ये काय घडतंय, आपल्या मुलाला बाप्तिस्मा दिला म्हणजे नेमकं आपण काय केलं, त्याच्या बाबतीतली आपली कर्तव्यं कोणती याचा मुलाचे सख्खे आणि मानलेले आईवडील या दोघांनाही संपूर्ण अर्थ कळला. इतकंच काय, माझ्यासारख्या ख्रिस्ती नसलेल्या मित्रालाही तो समजला.

नंतर अधिक चौकशी करता असंही समजलं की रोजच्या प्रार्थनांसकट सर्व प्रकारचे धार्मिक विधी वसईकडल्या चर्चमध्ये आता संपूर्णपणे मराठीतच होतात.

इतकंच नव्हे तर कुसुमाग्रजांची 'सर्वात्मका सर्वेश्वरा' ही आणि अशा काही अन्य सुंदर मराठी कविता, ज्ञानेश्वरांचं पसायदान ही आज चर्चमधील प्रार्थनांमध्ये समाविष्ट केली गेली आहेत. ही कवनं हिंदू कवींनी, संतांनी रचलेली आहेत म्हणून खिस्ती धर्मात काहीही बाधा येत नाही. ती सुंदर मराठीत म्हणजेच लोकभाषेत आहेत आणि त्यात चांगले विचार मांडले आहेत, हे महत्त्वाचे.

आणि त्याच वेळी फादर पिमेंटा आणि त्यांचे अन्य सहकारी यांनी लग्नं आणि मयताच्या संस्कारासकट खिस्ती धर्माचे सर्व विधी मराठीत करण्याचा आग्रह धरून कोणती क्रांती केली आहे याची जाणीव झाली. फादर पिमेंटांविषयी आदर वाढला. त्यांनी धर्म सामान्य माणसांच्या जवळ आणला होता. ईश्वर आणि मानव यांच्यात खऱ्या अर्थानं संवाद साधला होता. ज्ञानेश्वरांचे आजचे वारस ते आहेत. ज्ञानेश्वरीची सप्त शताब्दी पाळणारे नाहीत.

मी स्वत: एक तथाकथित उच्चवर्णीय हिंदू आहे. मला संस्कृतही प्राथमिक स्वरूपात का होईना समजतं असा मी दावा करू शकेन इतपत संस्कृतचं ज्ञान आहे. इतकंच काय, एक व्याकरणदृष्ट्या अतिशय शास्त्रशुद्धपणे बांधलेली आणि भारताचीच नव्हे तर जगातील मानवाचा प्राचीन वैचारिक आणि सांस्कृतिक वारसा सांभाळून ठेवणारी भाषा म्हणून मला संस्कृत भाषेसंबंधी आदर आणि प्रेमही आहे. यातील अर्थात प्राचीन हा शब्द महत्त्वाचा.

मी आजकाल पुरोहित बोलावून कोणतीही 'धार्मिक' पूजा करीत नाही. याचा अर्थ मी प्रार्थना करीत नाही, ईश्वराला रिटायर करायला निघालेल्या पंथातला आहे, असं मुळीच नाही. ही जरी आजची स्थिती असली तरी माझ्याही पूर्वायुष्यात काही 'धार्मिक' संस्कार ब्राह्मण भटजींनी केलेले आहेत. उदाहरणच द्यायचं तर माझा विवाहसंस्कार किंवा माझ्या आईवडिलांचे झालेले अंत्यसंस्कार.

पण हे लिहायला लाज वाटते की ह्या सर्व संस्कारांच्या वेळी मी नेमकं काय केलं, भटजी माझ्यासाठी काय मंत्र म्हणत होते, मी माझ्या पत्नीच्या संदर्भात, विवाहबंधनाच्या संदर्भात अग्नीच्या साक्षीने नेमक्या कोणत्या आणाशपथा घेतल्या आणि कोणती वचनं दिली हे मला त्या त्या वेळी काहीही समजलं नाही आणि माझी खात्री आहे की नव्याण्णव पूर्णांक नव्याण्णव शतांश हिंदूंची स्थिती माझ्याहून निराळी नाही.

माझ्या मते याला धर्म म्हणत नाहीत. हा धर्म जिवंत नाही. या विधीच्या वेळी केलेल्या शारीरिक कवायतीला (शंखावर पाणी घाला, या सुपारीला अक्षता वाहा इ.) धर्म, संस्कार हे नाव देणं म्हणजे शेतातल्या निर्जीव बुजगावण्याला जिवंत माणूस म्हणण्यासारखं आहे. त्यामुळे आजकालची नव्याण्णव पूर्णांक नव्याण्णव





अनुक्रमणिका

शतांश हिंदू लग्नं कसलाही संस्कार न होता रिसेप्शनचे समारंभ बनली आहेत, असं मला वाटतं.

यावर काही धर्माभिमान्यांचा असा दावा असेल की हे विधी तुम्हाला समजले नाहीत, याचा अर्थ ते समजून घेण्याची काहीच सोय तुमच्यापाशी उपलब्ध नव्हती असा नव्हे. या विधींचा साध्या मराठीत अर्थ सांगणारी पुस्तकं सिद्धेश्वरशास्त्री चित्राववांसारख्या विद्वानांनी लिहिलेली आहेत. ती वाचावीत आणि समजून घ्यावं. उगीच धार्मिक परंपरांवर टीका करण्याचा उद्धटपणा करू नये.

यावर मी एकनाथांनी चारशे वर्षांपूर्वी दिलेलंच उत्तर देईन. हे मराठीत न समजून घेण्यात मी माझा आळस झाकण्याचा प्रयत्न करीत नसून ते संस्कृतमध्ये असण्यात आणि मराठीत नसण्यात मराठी या माझ्या मातृभाषेचा या समाजाच्या लोकभाषेचा अपमान केला जातोय याबद्दल राग आहे. 'संस्कृत ही देववाणी आहे म्हणता तर मराठी काय चोरांनी केली आहे ?' एकनाथांनी विचारलं होतं.

अशा स्थितीत सामान्य माणसाकडून आचरणात आणला जाणारा आणि मातृभाषेत असल्यामुळे त्याला कळणारा हिंदू धर्म हा मोठ्या प्रमाणात मराठीतील काही पोथ्यांवर आधारित असतो. या पोथ्यांत काय असतं ?

धर्माचे सर्व संस्कार मातृभाषेतूनच झाले पाहिजेत. या संस्कारांची भाषा सुंदर पण सोपी असली पाहिजे. ज्याप्रमाणे न्यायालयातील चर्चा, युक्तिवाद आणि अखेर न्यायदान आरोपीला न समजणाऱ्या भाषेत होणं हे न्यायाचं विडंबन आहे तद्वतच मला माझ्या भाषेत ईश्वराशी संवाद न साधता मला न समजणाऱ्या भाषेत कोणातरी मध्यस्थ एजंटामार्फत साधावा लागणं हेही धर्माचं विडंबन आहे.

ज्ञानेश्वरांनी सुरू केलेली क्रांती सातशे वर्षांनंतरही अपुरी राहिली आहे. याचं कारण इच्छाशक्तीचा अभाव एवढंच आहे. जर ख्रिस्ती प्रार्थना केवळ पाचपंचवीस वर्षांच्या काळात लॅटिनच्या ऐवजी मराठीत येऊ शकतात तर संस्कृत प्रार्थना आणि पूजाविधी भारतीय लोकभाषांमध्ये यायला कोणती अडचण आहे ?

□ □

**मूळ प्रकाशन : 'अपुरी क्रांती', अंतर्नाद (पुणे) जून १९९७ पृ. ४५-६**
**लेखकाचा पत्ता : बी - ८४ ओशनगोल्ड, ट्विन टॉवर लेन,**
**प्रभादेवी, मुंबई ४०००२५**

# वाढता वाढता वाढे....!

डॉ. नीलिमा गुंडी

मुक्ता साधारण चार वर्षांची असतानाचा प्रसंग. मी भरली वांगी करण्यासाठी वांगी चिरत होते. तेवढ्यात खेळता खेळता ती माझ्याजवळ आली. मी चिरायला घेतलेल्या वांग्यांकडे तिचं लक्ष गेलं. त्यांतली दोन-तीन वांगी फारच छोटी होती. तिने त्या वांग्यांकडे बोट करून प्रत्येक शब्दावर जोर देत मला सांगितलं, ''आई, ही वांग्यांची बाळं आहेत. त्यांना चिरायचं नाही.''

माझे हात एकदम थबकलेच ! तिच्या भावनांचा आदर करून मी ती अगदी छोटी वांगी बाजूला ठेवली. 'झाडे जिवंत असतात' हे शास्त्रीय सत्य माहीत असलं तरी झाडांविषयी इतकी तरल संवेदना आपल्या मनात सतत जागी नसते. त्यामुळे तिचे 'वांग्यांची बाळं' हे शब्द माझ्या मनाला स्पर्शून गेले. तिने जणू त्या शब्दांतून स्वत:च्या बालपणाचे रंग सभोवतालच्या वस्तुजातांवर सहजपणे उधळले होते. मला थोडं असंही वाटलं - 'ही फार हळुवार तर होणार नाही ना ?'

पण काळ आपलं काम वेगाने करीत होता. ती हळूहळू मोठी होत होती. शाळेत रमत होती, खुलत होती. नवनव्या गोष्टींत रस घेत होती. शाळेत तिला एक दिवस वस्तूचा पाव भाग - चतकोर - ही संकल्पना शिकवली होती. तिला ती छान समजली होती. त्या वयात तिला कोणीतरी प्रश्न विचारला, ''काय मुक्ता, तू कोणाची ? आईची की बाबांची ?'' यावर तिने थोडा विचार करून शांतपणे उत्तर दिलं, ''मी चतकोर आईची, चतकोर बाबांची आणि अर्धी माझी.''

तिचं ते उत्तर ऐकताना मला तिचं छोटं रूप आठवलं. तेव्हा तिला कोणी कितीही वेळा वरचा प्रश्न विचारला तरी ती दरवेळी सांगत असे, 'मी अर्धी आईची नि अर्धी बाबांची'. आणि आईबाबांच्यात गमतीनं भांडणं लावू इच्छिणाऱ्यांचा अपेक्षाभंग करून टाकत असे.

पण आता व्यवहारातल्या एका सत्याने तिच्या भावविश्वाचा आकार बदलला होता. तिला आता तिच्या उमलत्या जगात स्वत:च्या पायावर उभं राहता येत





अनुक्रमणिका

होतं. तिच्या त्या उत्तरातून तिचा त्या वाढत्या वयाचा आनंद जणू झिरपत होता.

ते ऐकताना कितीही कौतुक वाटलं तरी मला एकीकडे वाटत होतं 'ही फार लवकर मोठी होतेयं !' आणि असंही मनात येत होतं 'आणखी काही वर्षांनंतर तिच्या जगात आपल्याला कदाचित चवथ्या दशांशस्थळाइतकी जागा असेल !'

□ □

**३, अन्नपूर्णा, १२५९, शुक्रवार पेठ,**
**सुभाषनगर, ५ वी गल्ली, पुणे ४११००२**

---

## जहाल जपानी

तरुणाची भाषा हा जपानमध्ये चिंतेचा विषय बनला आहे. अदब, विनय ही जपानी संस्कृतीची खास वैशिष्ट्ये. एकमेकांना अभिवादनही अत्यंत वाकून नम्रपणे करण्याची त्यांची पद्धत. जपानी भाषाही मृदू, मुलायम. सरस्वतीने मोरपीस फिरवावे अशी. परंतु अलीकडच्या जपानी मुलांची भाषा पाहिली की, सरस्वतीचे तांडव चालू आहे की काय असे वाटावे. जपानमधील वृद्धांनी तर तरुणांच्या या जहाल भाषेचा धसकाच घेतला आहे. या भाषेत कोठेही मार्दव नाही, ज्येष्ठांबद्दलचा आदर नाही. उद्धट आणि मग्रूर शब्दांनी भरलेल्या या भाषेने वृद्ध पिढीला धक्काच बसला आहे. तरुण पिढीबद्दल त्यांचा झपाट्याने भ्रमनिरास होत आहे. तरुणांचे वर्तन धक्कादायक आहे, त्यांच्यावर आमचे काही नियंत्रण राहिले नाही, अगदी पशूंसारखे ते वागू लागले आहेत, असे हितोत्सुबशी विद्यापीठातील प्राध्यापक कात्सूहिको टनाका यांचे मत आहे. जपानी भाषेवर त्यांनी अत्याचार चालवले आहेत. जपानी भाषा अगदी बेशिस्तीने बोलली जाते, असे ७५ टक्के लोकांना वाटते, तर विनयशील शब्दांचा वापर अत्यंत कमी झाला आहे, असे ६७ टक्के लोकांचे म्हणणे आहे. पूर्वी जपानमध्ये कोणाला वेळ विचारायची, तर "तुमच्या घड्याळावर नजर टाकून तुम्हाला तसदी दिली तर चालेल काय ? मी त्यासाठी तुमचा कायमचा ऋणी राहीन", असे नम्रतापूर्व म्हणावे लागे. पण हल्लीचे तरूण "ए थेरड्या, वेळ सांगू पाहू", असे म्हणतात ! भाषेतील हा आक्रमकपणा काळजी करायला लावणारा आहे.

□

**(महाराष्ट्र टाइम्स, गुरुवार, दि १५-१०-९२ वरून)**

# गनिमी कावा - काही समज व गैरसमज

का. ग. पित्रे

प्रबळ शक्तीविरुद्ध जेव्हा लढा सुरु होतो तेव्हा शक्तीविरुद्ध युक्ती असे त्या लढ्याचे स्वरूप असते. अनादिकाळापासून असे लढे सुरू आहेत व कालानुसार अशा लढ्यांचे तंत्र बदलत गेले आहे. कौटिल्य, माओ त्से टुंग व इतर जर्मन रशियन, इंग्लिश आदी विचारवंतानी अशा लढ्याची पद्धती लिहून ठेवली आहे. अपवाद काय तो मराठ्यांच्या गनिमी काव्याचा आहे. संपूर्ण सतराव्या शतकात परकीय सत्तेविरुद्ध ही पद्धती अवलंबून लढा दिला गेला, परंतु त्यासाठी संपूर्ण मराठी संज्ञासुद्धा आपल्याला आढळत नाही. गनीम हा शब्द फारसी आहे. तंत्र ठाऊक आहे पण मंत्र सापडत नाही. त्या मानाने वैदिक काळातील आर्य व अनार्य यांच्यामधील संघर्ष, दाशराज्ञ युद्ध, त्यानंतरच्या रामायण-महाभारतातील युद्धपर्वे त्यातील युद्धतंत्राबद्दल रीतसर माहिती देतात.

कुटिल नीती, गनिमी कावा, गरीला वारफेयर हे शब्दप्रयोग अशा स्वरुपाच्या लढ्याला संबोधून वापरले जातात. कालमानाप्रमाणे शस्त्रास्त्रे, तकनिकी ज्ञान, जेथे लढा होतो तेथील भौगोलिक परिस्थिती, मोठ्या राष्ट्रीय गटांच्या मुख्य संघर्षाचे एक अंग म्हणून जर असा लढा असेल तर बाहेरून येणारी शस्त्रांची, द्रव्याची व मनुष्यबळाची प्रत्यक्षाप्रत्यक्ष मदत ह्यांनुसार अशा लढायांची व्याप्ती, कालमर्यादा ह्यांमध्ये फरक असतात. राजकीय तत्त्वप्रणाली, धर्मकारण व परकीय सत्ता झुगारून देऊन स्वातंत्र्य प्राप्तीची तळमळ ह्यातून हे लढे उभे रहातात. काही कारणे सर्वमान्य असतात तर काही स्वार्थसाधूंनी प्रजेला भडकावून, एखाद्या अनिष्ट प्रसंगाचे निमित्त करून, स्वजनाविरुद्ध उभी केलेली बंडे असतात व त्यातून विनाकारण प्राणहानी मात्र होते. एकूण तत्त्व तेच राहून तंत्रे मात्र बदलतात, अर्थ बदलतात. एखाद्या क्रियेला तत्काळ किंवा कालांतराने एखादी संज्ञा प्राप्त होते. ती क्रिया बदलत जाते, तरी संज्ञा तीच रहाते अथवा क्रिया तीच असून संज्ञा बदलते.





अनुक्रमणिका

गनिमी कावा ही अशीच एक संज्ञा आहे. गनीम हा शब्द फारसी असल्यामुळे ही संज्ञा मुगल काळांत हिंदुस्थानात प्रचलित झाली असे मानावयास हरकत नाही. ही संज्ञा लढाईच्या एका प्रकारच्या संदर्भात वापरली जाते. परंतु अशा प्रकारची युद्धे प्राचीन काळात सुद्धा होत असल्यामुळे संज्ञा बदलली व ढोबळ मानाने युद्धाची क्रिया तीच राहिली. कुटिल नीति- गनिमी कावा - गुरिला वारफेयर हे तीन भाषांतले वेगवेगळे शब्दगट एक प्रकारच्या संघर्षाच्या संदर्भात वापरले जातात. कालमानाप्रमाणे संघर्षाचे स्वरूप बदलले, व्याप्ती वाढली व ह्या संज्ञा आपोआपच जास्त व्यापक स्वरूपाच्या झाल्या. तेव्हा काटेकोर व्याख्या न करता एक प्रकारची युद्धनीती, युद्धकला अथवा युद्धतंत्र (ह्या शब्दांचेसुद्धा अनेक अर्थ व अनर्थ आहेत) असे गृहीत धरून त्या संज्ञेचा कीस न पाडता त्या संघर्षक्रियेचा परामर्श घेतल्यास त्यातून ज्ञानात भर पडेल.

कुटिलयुद्ध, गनिमी कावा, गुरिला वारफेयर ह्यांनी अभिप्रेत संघर्षाचे काही घटक आहेत.

१) दुर्बलाचा प्रबलाशी लढा

२) अनुकूल भौगोलिक परिस्थिती

३) स्थानिक प्रजेची अनुकूलता व सहानुभूती

४) निसर्गाकडून जगण्यास मदत, हवा, पाणी, आसरा, कंदमुळे, कमी रोगराई इत्यादी.

५) बाहेरून प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष सहकार्य, आर्थिक शस्त्रसामुग्रीची मदत, प्रशिक्षण यंत्रणा, आसरा, वाहनदळणवळण इत्यादी सुविधा.

६) प्रजेला भारावून टाकेल असे ध्येय, आदर्श व प्रभावी नेतृत्व, तत्त्वप्रणाली, श्रद्धा व विश्वास.

७) प्रसार व प्रचार यंत्रणा व तळागाळापर्यंत नेतृत्व शारीरिक हालअपेष्टा सोसून वेळी ध्येयाकरिता बलिदान करण्याची तयारी प्रसारमाध्यमातून करण्यात येते. भगवान श्रीकृष्ण 'लढ' म्हणून सांगतात व अर्जुन लढतो अर्थात तोही रणांगणात उभा राहून सारथ्य करून मगच आदेश देतो. कुणी हरहर महादेव म्हणतात, कुणी ''दीन दीन'' म्हणतात. कुणी स्वराज्याची घोषणा करतात, कुणी जिहाद पुकारतात. नेते चेतावणी अथवा चिथावणी देतात व अनुयायी स्वत:ला झोकून देतात.

८) दहशत, आमिषे व द्रव्य यांचा वापर लोकांची मने वळविण्याकरिता अथवा त्यांच्याकडून सक्तीने काम करवून घेण्याकरिता केला जातो.

''गुरिला वायफेयर'' हा शब्दप्रयोग व्यापक अर्थाने ह्यापुढे वापरू या. ह्या प्रकारच्या संघर्षाला स्वतंत्र सैन्यबल उभे करावे लागते. त्यात बहुतांशी पायदळ व क्वचित प्रसंगी देशी आरमार असते. हवाई दल नसतेच. परंतु इतर मदत

करणाऱ्या देशांतून विमानांतून हत्यारे, दारूगोळा, छत्रीधारी सैन्य इत्यादी पुरवता येते. अशा सैन्याला अन्नधान्य व इतर रसद पुरवणारी रीतसर यंत्रणा नसते. तसेच जखमींना वैद्यकीय मदतही कमी पडते. त्यांना महावारी वेतन नसते व लढाईच्या हत्यारसामग्रीत एकता नसते व दारूगोळा व नवीन हत्यारे मिळण्याची शक्यताही नसते. अशा सैन्याचे नेतृत्व कमकुवत असते. कारण अनुभवी लढवय्ये पुढारी नसतात.

जी प्रबळ शक्ती ह्या गुरिला आर्मीला तोंड देत असते ती कैक वेळा परदेशीय असते व तिचे जुलमी राज्य लोकांना नको झालेले असते. बहुतेक गुरिला लढाया स्वातंत्र्यप्राप्तीसाठी, परकीयांची सत्ता झुगारून देण्यासाठी असतात. देशांत जुलमी राजवटीविरुद्ध प्रजा बंड करून उठते त्याची कारणे वेगवेगळी असतात. पण राजवट उलथवून दुसरी राजवट स्थापन करणे हा मुख्य हेतू असतो. लोकांनी उभी केलेली फौज राष्ट्रीय फौजेविरुद्ध लढत असते व काही प्रसंगी देशाची फौजही त्या बंडात सामील होते.

बंडखोर सैन्यात शिस्तीचा अभाव, आपआपल्या नेत्याशी इमान, लूटमार करून गुजराण करणे, प्रजेवर क्रूर अत्याचार करणे, कायदा धाब्यावर बसविणे, खंडणी वसूल करणे. कत्तल, जाळपोळ, खून आदी दहशत निर्माण करणारे प्रकार करणे इत्यादी गोष्टी आढळतात.

बंडखोरीच्या कारणांत धर्म, राष्ट्रप्रेम, राजकीय विचारप्रणाली इत्यादींचा समावेश असतो. ह्या बुरख्याखाली निव्वळ लूटमार करणाऱ्या टोळ्या व त्यांच्या स्वाऱ्या, इतिहासात अनेक ठिकाणी नमूद आहेत.

हिंदुस्थानाच्या इतिहासात महमूद गझनी, महमद घोरी आदींच्या स्वाऱ्या, मराठ्यांनी गनिमी काव्याचे तंत्र वापरून परकीय सत्तेला दिलेली झुंज, वायव्य सरहद्द प्रातांत पठाणांची ब्रिटिश सत्तेविरुद्ध बंडाळी, १८५७ सालचे बंड, काँग्रेसच्या जहाल गटाच्या अतिरेकी कारवाया, स्वातंत्र्यप्राप्तीच्या काळातील भूमिगत चळवळी, हैद्राबादमधील रझाकार चळवळ, नागालँड, मीझोराम, गोरखा आंदोलन, कम्युनिस्टप्रेरित चळवळी (नक्सलाईट), उत्तराखंड आंदोलन, इत्यादी अनेक लहानमोठ्या चळवळी व लढाया गुरिला वारफेयरमधे जमा आहेत.

जागतिक इतिहासात ड्यूक ऑफ वेलिंग्टनचे नेपोलियनविरुद्ध पेनिनशुलर वॉर, पराभूत फ्रेंच सेनेवर रशियन प्रजेने केलेले हल्ले, हिटलरविरुद्ध युरोपमध्ये फ्री फ्रेंच युगोस्लाविया, पोलंड आदी देशांतली झुंज, स्वातंत्र्यप्राप्तीसाठी इटलीची झुंज, ज्यूंचा लढा, व दक्षिण आशियात कोरिया, व्हिएतनामा, मलाया, व जावासुमात्रा येथील गनिमी युद्धे प्रसिद्ध आहेत.

वर दिलेले '७-८ घटक कमी अधिक प्रमाणात प्रत्येक लढ्यात दिसून येतात.

चीनच्या मोओ त्से टुंगने गुरिला वारफेयरला तत्त्वबद्ध केले व गुरिला वारफेयरचे तंत्र व मंत्र याची सांगड घातली. मराठ्यांनी गनिमी काव्याने प्रत्यक्ष लढून स्वराज्याची स्थापना केली व पुढे त्याचे साम्राज्यात रूपांतर केले. परंतु त्यावर शास्त्रशुद्ध लेखन केले नाही. बखरी व इतर कागदपत्र राजकारणावर जास्त भर देऊन आहेत. लढाई हे एक शास्त्र आहे. लढणे ही एक अवगत करून घेता येईल अशी कला आहे हा विचारच नव्हता. त्या मानाने आर्यांच्या वेदकाळात गुरुआश्रमात शिष्यांना धनुर्विद्या, घोड्यावर बसणे, गदायुद्ध इत्यादी शिकवीत व ज्याअर्थी चक्रव्यूह रचले गेले त्याअर्थी, युद्धशास्त्र व तंत्र आणि कला ह्यांचा विचार झाला असावा. कौटिल्यांनी अर्थशास्त्रात अनेक कल्पना मांडल्या आहेत.

मराठ्यांच्या युद्धेतिहासाचे अवलोकन केल्यास असे दिसून येते की छत्रपती शिवाजी महाराजांनी आदिलशाहीच्या विरुद्ध जो संघर्ष केला तो खऱ्या अर्थाने गनिमी काव्याच्या तंत्रात बसतो. शाहिस्तेखानाची फजिती, सुरतेवर स्वाऱ्या, काही अंशी साल्हेर-मुल्हेरच्या लढाया यापण गनिमी काव्याच्या लढाया म्हणता येतील. पण १७६४ नंतर कर्नाटकच्या मोहिमेनंतर मराठ्यांनी गनिमी काव्याचे तंत्र सोडून रीतसर लढाईचे तंत्र (Conventional Warfare) अवलंबिले. नाही म्हणावयास राजारामाच्या मृत्यूनंतर ताराबाईने शाहूच्या सुटकेपर्यंत जो मुगलांशी लढा दिला तो गनिमी काव्यावर आधारित होता असे म्हणता येईल. दोन्ही बाजूंनी जेव्हा सुसज्ज सेना रणांगणात उभ्या ठाकतात तेव्हा गनिमी कावा संपून रीतसर लढाई सुरू होते. तशा लढ्यात ज्या टोळ्या एकमेकांवर हल्ले करतात. त्या "लढाऊ गस्त" (Fighting Patrols) ह्या सदरात येतात.

गनिमी काव्याच्या लढाईत शत्रूची वित्तंबातमी मिळविणे अत्यावश्यक असते. त्याकरिता "साम, दाम, दंड, भेद" व कुटिलनीतीचा अवलंब केला जातो. माओ त्से टुंगने जे गुरिला वारफेयरचे तंत्र सांगितले आहे ते ह्याप्रमाणे.

"शत्रू प्रबळ असून चाल करून आला की माघार घ्या. शत्रूने एका ठिकाणी तळ ठोकला की लहान लहान टोळ्यांनी त्यांच्यावर हल्ले करून त्याला जेरीस आणा, त्याची रसद तोडा, त्याच्या सैनिकांच्या मनांत भीती उत्पन्न करा, एकटेदुकटे कुणी सापडल्यास त्याच्यावर हल्ले करा. शेजारचे मुलुख जाळपोळ करून उजाड करा, शत्रूची उपासमार करा व जेव्हा शत्रू माघार घेऊ लागेल तेव्हा त्याच्यावर तुटून पडा.

मराठ्यांनी रीतसर युद्धाचा अवलंब केला. बाजीरावाने घोडदळ उभे केले, सरंजामशाही स्थापली, नानासाहेबांनी तोफखान्याच्या समावेश केला व शिंदे होळकरांनी परकीय अंमलदार नेमून सैन्याची पाश्चिमात्य धर्तीवर पुनर्रचना केली. तरीही स्थळकाळवेळ पाहून त्यांनी ब्रिटिशांविरुद्ध आंग्ल-मराठा युद्धाच्या काळात

(१७८५-१८१८) वरचेवर रीतसर युद्धाच्या जोडीने गनिमी काव्याचा वापर केला, यशवंतराव होळकरने कर्नल मॉन्सनची कोटा ते आग्रा ह्या मार्गावर केलेली लांडगेतोड, १८०५ ते १८१८ ह्या काळातल्या बोरघाटातल्या लढाया व युद्धतंत्र गनिमी काव्यावर आधारले होते.

गनिमी काव्यात लढणाऱ्या टोळ्यांना अंतराअंतरावर तळ आवश्यक असतात. कारण त्यांना दाणागोटा लागतो. व जखमी सैनिकांना आश्रय हवा असतो. तसेच कित्येकवेळा बायकामुळे सुरक्षित जागी ठेवावी लागतात. महाराष्ट्रात ठिकठिकाणी असलेले डोंगरे भुईकोट व जलदुर्ग हे ह्या दृष्टीने बहुमोल ठरले. हे जाणूनच किल्ल्यावर ताबा मिळविणे, गेलेले किल्ले पुन्हा जिंकून घेणे, नवे किल्ले व सिंधूदुर्ग बांधणे. किल्ल्यावर शिबंधी वरसद यांची रीतसर तयारी करणे इत्यादी गोष्टी पार महत्त्वाच्या ठरल्या. किल्ल्याचे महत्त्व ओळखून इंग्रंज व मुगल ह्या परकीय सत्तांनी युद्धांत किल्ले हेच लक्ष ठेवले. पुरंदरच्या तहात ३३ पैकी ३२ किल्ले शिवाजीमहाराजांना मुगलांना द्यावे लागले.

□ ■

**निवृत्त प्राध्यापक, संरक्षणविद्या विभाग, पुणे विद्यापीठ**
**१२२१ बी ३ रँग्लर परांजपे रस्ता, पुणे ४११००४**

---

## षट्क

क्रिकेटच्या खेळात एका चमूतील गोलंदाज विरुद्ध चमूतील फलंदाजांवर चेंडू फेकतो, त्यात एका वेळी एक गोलंदाज फक्त सहा चेंडू फेकू शकतो. सहा चेंडूच्या गटाला 'ओव्हर' असे नाव असून त्याला मराठीत 'षट्क' हा उत्तम शब्द धावते समालोचन करणारे वापरतात. पण त्याचे व्याकरणशुद्धरूप माहीत नसल्यामुळे त्यांच्याककडून त्याच्या उच्चारात चूक होते. ते हा शब्द 'षटक' ('शतक' सारखा) उच्चारतात. परंतु हा उच्चार चूक आहे. मूळ शब्द आहे 'षट्'; त्याला समुदायवाचक 'क' प्रत्यय लावून 'षट्क' हा शब्द तयार केला आहे. अशा प्रकारचे अन्य शब्द म्हणजे 'द्विक', 'त्रिक', 'पंचक' इ. त्याचा उच्चार करताना त्यातील 'ट्' हलंत आहे हे लक्षात ठेवून केला पाहिजे. त्याचे अनेकवचन 'षट्कें', परंतु बोलताना तो एकारान्त दीर्घ शब्द आपण अकारांत उच्चारतो. तो 'षट्कं' असा लिहावा व वाचावाही.

□

**(आजचा सुधारक, जानेवारी १९९४ मधून सौजन्याने)**





अनुक्रमणिका

१

# राजमा, कंगाल आणि गुलाबकावली

गौरी देशपांडे

श्रीपाद जोशी ("एका शब्दाचा पाठलाग" भा.आ.जी. १४.२) यांचे लिखाण वाचून पुढील विचार सुचले :

१) जर त्यांनी राजमाबद्दलची माहिती त्यांच्या "मित्रा" ला न विचारता "मैत्रिणी" ला विचारली असती तर त्यांचा पाठलाग तिथेच थांबला असता. किंबहुना पुण्यातल्या कुठल्यातरी वाण्याकडे जाऊन त्यांनी "राजमा" मागितले असते तरीही तो थांबला असता. पंजाबीत "मा" की दाल म्हणजे उडदाची डाळ आणि, परिचित वस्तूंनाच काही विशेषण लावून ते नाव इतर वस्तूंना द्यायचे या नियमानुसार (उदा. आंबा आणि रातांबा) "मा" ला "राज" (लाल) हे विशेषण लावून राजमा झाला. हा "काळा' घेवडा नसून "लाल" घेवडा आहे, आणि मेक्सिकोत जवळजवळ रोज खायचे कडधान्य आहे. फलटणकडे याच्या चट्टेरीपट्टेरी बांधवाला वाघ्या घेवडा म्हणतात.

२) "कंगाल" याचा थेट आणि खास संबंध "कंकाल" म्हणजे हाडांचा सापळा यांच्याकडे लागतो हे त्यांना मराठीतलेच कंगालच्या आधी येणारे "भूक" हे विशेषण लक्षात घेता समजले असते.

३) का कुणास ठाऊक, पण 'गुलाबकावली' म्हणजे "सोनटक्का" असे लहानपणापासून मला ठाऊक आहे. तो अर्थ कधी व कुणी सांगितला ते स्मरणात नाही, पण जोशांना आढळलेल्या "हळदीच्या जातीच्या" फुलाला तो मिळता-जुळता आहे. हा अर्थ बरोबर आहे का, ते मला ठाऊक नाही, पण शोध घ्यावा असे वाटते.

□

३०३ बी, क्लोव्हर गार्डन्स, ४ नेलर रोड,
कोरेगाव पार्क, पुणे ४११ ०४०





अनुक्रमणिका

## २
## राजमा म्हणजे श्रावण घेवडा

श्रावण घेवडा म्हणजे राजमा. उत्तर हिंदुस्थानात त्यास राजमा बीन्स् या नावानं ओळखलं जातं. राजमाच्या बिया विविधरंगी आणि विविध रंगांच्या संमिश्र छटा असलेल्या असतात.

□

**(दि. २४-७-१९९७ च्या पुणे आकाशवाणीवरील 'उत्तम शेती' या सकाळच्या ६.१० च्या कार्यक्रमातील निवेदनावरून) - संपादक**

**'राजमा'संबंधी भाषा आणि जीवनमधील इतर संदर्भ**

१) १४.२ उन्हाळा १९९६, श्रीपाद जोशींचा लेख. पृ. ३८.

२) १४.४ दिवाळी १९९६, लीला अर्जुनवाडकरांची दोन पत्रे. पृ. ६०.

**— संपादक**

## ३
## वृत्तांच्या गणिती शक्यता

**मनोहर राईलकर**

*गणवृत्त आणि गणित यासंबंधीच्या विषयावरील माझ्या लेखावर (अंक १३/१ हिवाळा १९९५) 'भाषा आणि जीवन'च्या वर्ष १४/२ उन्हाळा १९९६ अंकात दोन प्रतिक्रिया आल्या आहेत. त्यांच्या बाबतीत प्रतिसाद देण्याकरता हा लेख.*

माझ्या प्रस्तुतच्या लेखात गणिताची बरीच चर्चा आहे आणि गणित हे रुक्ष मानलं जातं. निदान, गणिताबाहेरील व्यक्ती तर अशा लेखाच्या वाटेला फारशा जातच नाहीत. हे लक्षात घेता, रत्नमालाबाई आणि विद्यागौरीबाई यांनी केवळ दखलच घेतली असं नाही, तर लेख वाचून त्यावर तपशीलवार प्रतिक्रिया व्यक्त केली आहे. त्यामुळं मला आनंद झाला. मी दोघींचाही आभारी आहे. माझे विचार पटलेच पाहिजेत असं माझं म्हणणं नाही. त्यांच्या प्रतिक्रियांबद्दल माझं म्हणणं असं:-

१) वृत्तांना नावं देण्यापेक्षा अनुक्रमांक द्यावेत, अशी जी सूचना मी आपल्या लेखात लिहिली होती ती, गणिताबाहेरील व्यक्तींना जाणवण्याकरता मांडली होती. पण ह्या सूचनेबरोबरच 'आपल्याला गणवृत्तांमागील जे गणिती सौंदर्य जाणवत होतं ते इतरांनाही सांगावं, दाखवावं आणि ह्या कामात संगणकाचा कसा उपयोग करता

येईल, हे सांगावं,' हाही एक उद्देश माझ्या मनात होता. त्या कल्पनेबाबत मी काही भाषापंडितांशी बोललो. त्यांना ही कल्पना आवडली. संपादकांनाही आवडली. म्हणून तर लेख प्रसिध्द झाला. (आवडला असं मी म्हणत नाही.) आणखीही काही वाचकांना आवडली. अर्थात, वृत्तांच्या कल्पनेचाच जर आज उपयोग नसेल तर माझ्या प्रस्तुत प्रमेयाचाही व्यावहारिक उपयोग नाही, हे बरोबर आहे.

प्रतिक्रियांना सविस्तर उत्तरं देण्यापूर्वी गणिताच्या एकूण प्रकृतीबद्दल थोडं सांगितलं पाहिजे. गणिताच्या बऱ्याच शाखांचा उगम व्यावहारिक प्रश्नांच्या सोडवणुकीच्या धडपडींमधून झाला आहे, ही गोष्ट खरी आहे. मात्र, एकदा ते काम झाल्यावर स्वतंत्रपणं त्या शाखेची प्रगती चालू राहिल्याचं तर गणिताच्या इतिहासाला माहीतच आहे. पण, कित्येकदा स्वतंत्रपणं केवळ आत्मरंजनाच्या हेतूनं आणि जगाला त्याचा उपयोग होईल की नाही याचा मुळीही विचार न करता गणिताच्या कित्येक शाखांचा जन्म आणि विकास झाल्याची उदाहरणं आहेत. ज्यावेळी एखाद्या गणित्यानं एखादं नवीन प्रमेय मांडलं त्यावेळी ते अव्यवहार्य किंवा 'वेळ वाया घालवण्याचा प्रकार' (शब्द वेगळे असतील) म्हणून त्याच्या म्हणण्याकडे त्या त्या वेळी वैज्ञानिकांनी दुर्लक्ष केल्याची, आणि अनेक वर्षांनंतर त्याच्या त्या धडपडीचा उपयोग गणित्यांच्या आणि वैज्ञानिकांच्या लक्षात आल्याचीही उदाहरणं आहेत. कधी तर पोरकटपणा म्हणून तरुण विद्यार्थ्यांना उपेक्षाही सहन करावी लागल्याची उदाहरणं आहेत. जर्मन गणितज्ञ गाऊस, हंगेरियन गणितज्ञ यानोस बोल्याए आणि रशियन गणितज्ञ लोबाशेव्स्की (याचा शोध प्रथम प्रसिद्ध झाल्यामुळं त्याच्या नावानं ही भूमिती ओळखली जाते) या तिघांनी (स्वतंत्रपणं) केवळ आत्मानंदासाठी (अठराव्या शतकात) न-युक्लिडीय भूमितीच शोधली. पण तिचा उपयोग आइनस्टाईनला विसाव्या शतकाच्या आरंभी आपला सापेक्षता सिध्दांत मांडण्याकरता उपयोगी पडला. (दरम्यान शोध लागलेल्या रीमानीय भूमितीसारख्या आणखी काही गणिती शाखांचाही उपयोग करावा लागला, हेही नमूद केलं पाहिजे.) म्हणजे एका अर्थानं दीडेकशे वर्षं वैज्ञानिकांनी (गणितज्ञांनी नव्हे) तिच्याकडे दुर्लक्ष केलं होतं. हे तिघेही आपला बहुमूल्य वेळ अव्यवहार्य कामात वायाच घालवीत होते, असं म्हणणार का? (मला जाणवलेलं प्रस्तुत गणिती प्रमेय इतक्या मोठ्या दर्ज्याचं आहे असं मला म्हणायचं नाही.) आणि मग वृत्तांचा आणि वृत्तांच्या वर्गीकरणाचा तरी काय व्यावहारिक उपयोग आहे? व्याकरण, तत्त्वज्ञान, तर्कशास्त्र, लिंग्विस्टिक्स ह्या साऱ्या निरुपयोगी ज्ञानशाखा आहेत असंच म्हणायला हवं. मंगळावर सजीव सृष्टी आहे की नाही यासारख्या निरुपयोगी गोष्टींत इतका पैसा, वेळ आणि श्रम का दवडावेत?

प्रस्तुत वाटल्यामुळं इथं काही ऐतिहासिक माहितीचा उल्लेख करतो. वास्तविक गाउसला लोबॅशेव्स्कीय भूमितीचा शोध सुमारे तीस वर्षं आधीच लागला होता.

पण तोवर गाऊस इतका मोठा गणिती म्हणून मान्यता पावला होता की, 'एवढ्या मोठ्या गणितज्ञाला हा खुळचटपणा शोभून दिसत नाही', अशी टीका आपल्यावर होईल ह्या कल्पनेनं आपला शोध प्रसिद्ध करायला तो धजावला नाही. दुसरीकडे आपण ह्या भूमितीवर विचार करतो आहोत, असं ज्यावेळी यानोस बोल्याएनं आपल्या वडिलांना (वूल्फगांग बोल्याए) पत्रातून कळवलं त्यावेळी 'मी स्वत: आपल्या आयुष्यातल्या रात्रीच्या रात्री ह्या निरुपयोगी कामात वाया घालवल्या आहेत. आता तू त्या मार्गाला जाऊ नकोस, यात काहीही मिळणार नाही,' असं त्याच्या वडिलांनी त्याला खडसून लिहिलं. अर्थातच त्यानं वडिलांचं न ऐकता आपलं काम चालूच ठेवलं. पण, ह्या भूमितीची अनेक प्रमेयं (शून्यातून जग निर्माण केल्याचं,) सापडल्याचं त्यानं जेव्हा वडिलांना लिहिलं, तेव्हा मात्र 'मोसम आला की सर्वत्रच फुलं फुलतात. तेव्हा तू आपला शोध त्वरित प्रसिद्ध कर,' असंही पत्र वडिलांनी त्याला लिहिलं!

सुप्रसिद्ध भारतीय गणिती रामानुजन यांचे गुरु असलेले प्रख्यात इंग्रजी गणितज्ञ G.H. Hardy आपल्या A Mathematician's Apology मध्ये म्हणतात, '... very Little of Mathematics is useful practically, and that little Mathematics is comparitively dull.' (Cambridge University Press, London, 1989 P. 89) शुद्ध सोन्याप्रमाणं शुद्ध गणितही फारशा कामाचं नसतं. गणिताचा आपल्याला उपयोग होईल असं इतर ज्ञानशाखांमधील पंडितांना वाटतं म्हणून ते त्याचा उपयोग करण्यास प्रवृत्त होतात. गणितानं स्वत:पुरती मान्य केलेली आदर्श व्यवस्था व्यवहारात कधीच पहायला मिळत नाही. पण, गणितानं मांडलेली सूत्रं आपल्या कामाच्या दृष्टीनं पुष्कळशी किंवा काहीशी मिळतीजुळती आहेत, असं इतर ज्ञानशाखांतील पडितांना वाटतं म्हणून ते गणिताचा उपयोग करू पाहतात. वर्तुळाचा परिघ आणि व्यास यांचं गुणोत्तर पाय नावाच्या ग्रीक अक्षरानं दाखवतात. ह्या पायची नेमकी किंमत कुणालाच ठाऊक नाही. आणि ती कधीही माहीत होणार नाही. १००० दशांश स्थळापर्यंत त्याची किंमत काढलेली माझ्या वाचनात आली आहे. (ह्या माहितीचाही व्यवहारात शून्य उपयोग आहे. व्यवहारात चारसहा स्थळांपर्यंतची किंमत (किंवा २२/७ सुद्धा) पुरेशी असते. पण ज्याला जाणवतं त्याला ह्या माहितीतही आनंद मिळतो.) पायथागोरसचं प्रमेय एकदा सिद्ध केल्यानंतर पुन्हा पण वेगवेगळ्या (शंभराहून अधिक) प्रकारं त्याची सिध्दता देण्यात काय अर्थ आहे? पण नाही, नवनवीन सिध्दता शोधण्यात (आणि त्या इतरांना सांगण्यातही) आनंद आहे. अशी कित्येक उदाहरणं सांगता येतील. शिवाय असतील नसतील त्या सर्व पर्यायांची एकदाची पुरती गणती (enumeration) करून टाकायची, हाही गणिताचा एक स्वभावगुण आहे. मी तोही गुण वापरला. गणिताच्या सर्वसाधारण स्वरूपाबद्दल सांगणं एवढाच उद्देश आहे. गणितावर लिहिणं हा उद्देश नाही. ह्यात गणिताच्या एकूण अव्यवहार्यतेबद्दल

दिग्दर्शन करायचं होतं. म्हणून इतकं पुरेसं आहे. (जरा जास्तच झालं असावं! त्याबद्दल क्षमस्व)

तेव्हा अव्यवहार्यता हा गणिताचा जन्मगुणच आहे. त्याला कुणाचा इलाज नाही. विद्यागौरीबाईंवर पहिल्या वाचनात माझ्या लेखाचा बराच प्रभाव पडला आणि त्यांना तो आकर्षक वाटला, याचा मला आनंद आहे.

२) व्यवहारात हे कुणी वापरणारच नसल्यानं संगणकाचा वेळही कुणी वाया दवडणार नाही. तेव्हा रत्नावलीबाईंची काळजी अनाठायी आहे.

३) रत्नावलीबाईंनी संगणकाच्या स्मरणशक्तीबद्दल लिहिलं आहे. त्यांना मेमरी म्हणायचं आहे की स्पेस म्हणायचं आहे, हे स्पष्ट नाही. वर उल्लेख केलेली पायची १००० स्थळापर्यंतची किंमत संगणकाच्या साह्यानंच काढली आहे, एवढं सांगितलं म्हणजे पुरेसं आहे. आपला घरगुती संगणकसुध्दा अशी काही कामं करू शकतो. संगणकाच्या रजिस्टरवर फार मोठ्या संख्या दाखवता येत नसल्या तरी data - base जातीच्या Software मध्ये लिहिलेली आज्ञावली वाचून, तो क्रमशः संख्या निर्माण (generate) करू शकतो. आणि तत्त्वतः त्यावर कसलीही बंधनं नाहीत. उदाहरणार्थ, पायची १००० स्थळं म्हणजे कमी नव्हेत.

४) रत्नावलीबाईंनी दिलेला पहिला पर्याय ००० ००० हा निखालस चुकीचा आहे. (ही त्यांची नजरचूक असू शकेल.) कारण, शेवटचं अक्षर नेहमी गुरूच असतं. शिवाय, सर्वच रचनांना वृत्तं म्हणून मान्यता मिळाली पाहिजे असा माझा हट्ट नाही. (असण्याचं कारणच नाही.) पण आजवर लक्षातही आली नाहीत, अशी काही वृत्त यातून मिळण्याची शक्यता आहे, नाही का?

५) दशचिन्ह रूपातील संख्यांचं द्विचिह्न रूपात (आणि उलट) करणारे प्रोग्राम सायंटिफिक कॅल्क्युलेटरमध्येही असतात. ते पुन्हा पुन्हा लिहिण्याची गरज नसते. माझा तो लेख तयार करताना मी अशाच कॅल्क्युलेटरचा उपयोग केला होता. आणि ज्यांच्याकडे विंडोज आहे, त्यांच्या संगणकावरच असा कॅल्क्युलेटर सापडेल. त्यावर हे रूपांतर करता येतं. त्यावर १३ स्थळापर्यंतच्या संख्यासुध्दा लिहिता येतात.

६) विद्यागौरीबाईंचा आक्षेप त्यांनी काही शक्यता मांडून घेतला आहे. तो माझा विषय नाही. त्यामुळं मी त्यावर काही बोलणं अनुचित ठरेल. पण आजवर वापरण्यात आलेली काही वृत्तं त्यांनी मांडलेल्या प्रत्येक कसोटीवर उतरणारी आहेतच असं नाही. (म्हणजे गेय तरी नाहीत.) हा अनुभव असण्याचाही संभवही फारसा नाही. पण, माणसाला नावीन्याची आवड असतेच. (म्हणून तर इतकी तरी वृत्तं निर्माण झाली.) तेव्हा, इतक्या विविध प्रकारची वृत्तं उपलब्ध आहेत, ह्या माहितीचा उपयोग एखाद्याला करावासा वाटला तर करता येईल, नाही का? त्यामुळं आजवर कुणीच कधी मांडलं नाही अशा एखाद्या वृत्तात (वाटल्यास) कुणी पद्यरचना करूही





अनुक्रमणिका

शकेल. मूळ लेखात उल्लेखिल्याप्रमाणं रा.द.पराडकरांना असाच प्रश्न पडला होता.) आणि काय सांगावं, ते गेयही असू शकेल. कदाचित प्रचारात असलेल्या वृत्तांपेक्षा सरसही असू शकेल. पण इतक्या संख्येनं वृत्तं असू शकतात, याची तरी आजवर किती जणांना (मी धरून) कल्पना होती, हाही एक विचार करण्यासारखा मुद्दा आहे.

(७) विद्यागौरीबाईंनी नजरचुकीनं लघूऐवजी ह्रस्व लिहिलं आहे. शेवटचं अक्षर (ह्रस्व असलं तरी) गुरूच मानलं जातं. आणि २७ (शेवटचं सोडून सर्व लघू घेऊन) अक्षरांच्या वृत्तात पद्य लिहाच अशी काही कोणी बळजबरी केलेली नाही. पण शेवटचं सोडून बाकी सर्व अक्षरं लघू असलेलं वृत्तच असू शकत नाही, असंही नाही. मी कवी नव्हे. तरी अकरा अक्षरांचा एक श्लोक मला सुचला आहे. गण ननलग असे आहेत.

शरण परम सकल जना ।<br>चरणकमल गजवदना ॥<br>पुनितचरण नितवरदा ।<br>विमलवदन धवलरदा ॥

(८) आजकाल फार कुणी गणवृत्तांचा उपयोग करीत नाही असं विद्यागौरीबाई म्हणतात. त्याला मी काही करू शकत नाही. माझ्या लेखामागील उद्देश मी वर मांडलाच आहे. त्यामुळं पुन्हा ह्या मुद्द्यावर काही लिहिण्याची गरज नाही.

(९) जीवनात केवळ आत्मानंदाकरता कित्येक निरुपयोगी कामं माणसं करीत असतात. याची जगभरात वाटेल तेवढी उदाहरणं मिळतील. हे काम मी आत्मानंदाकरता केलं आहे. आणि माझ्यासारख्या ज्या कोणाला त्यात आनंद वाटेल ते तो घेतील.

ही संधी घेऊन आणखी एका मुद्द्याचा ओझरता उल्लेख करतो. वृत्तांना क्रमांक देण्याचा एक अधिक चांगला मार्ग आहे. शेवटचं गुरू अक्षर असतंच. आणि आपल्यालाही आरंभी १ यायला पाहिजे. त्याकरिता वृत्ताच्या द्विचिन्ह रूपातील क्रमांकाचा शेवटचा १ उचलून प्रारंभी घेतल्यानं वृत्तांचे क्रमांक निम्म्यावर येतील. ह्याबद्दल जास्त विवेचन करण्याचं हे स्थळ नव्हे म्हणून एवढ्यावरच सोडून देतो. ज्यांना यात रस आहे, त्यांनी करून पहावं, अथवा मला लिहावं.

माझ्या आधी असा प्रयत्न करणारे (लोकमान्य) टिळकच होते आणि माझ्या लेखावर आक्षेप घेणाऱ्या दोघी टिळकच आहेत, हा गंमतीदार योगायोग मला जाणवतो. पण लेख साक्षेपानं वाचल्याबद्दल पुन्हा एकदा दोघींचे आभार मानून ही चर्चा संपवतो.

मागच्या वेळी एक उल्लेख माझ्याकडून अनवधानानं राहून गेला. त्याबद्दल दिलगीर आहे. माझ्या त्या लेखाकरता वृत्तांबद्दलची माहिती मला प्रा.मा.ना. आचार्यांनी पुरवली होती. □

'गजांजली', ४६ वाळवेकर इस्टेट पुणे ४११ ००९

४

# प्रतिक्रियेवरची प्रतिक्रिया

**नीती बडवे**

(१) 'दिवाळी १९९५' च्या अंकात प्रसिद्ध झालेल्या माझ्या 'धारणक्षमता विचारा' संबंधीच्या लेखावर पुंडलिकांची प्रतिक्रिया हिवाळा १९९६ च्या अंकात प्रसिद्ध झाली आहे. प्रतिक्रियेबद्दल पुंडलिकांना धन्यवाद.

लेख लिहितांना या सिद्धांताचे तथ्य काय ते मराठी वाचकांपुढे मांडण्याचा आणि या सिद्धांताच्या उपयोजनाला चालना मिळवण्याचा हेतू होता. लेखाची विस्तारमर्यादा लक्षात घेऊन उणिवांची चर्चा तिथे केलेली नाही. कारण 'तेनिये' नी मांडलेला 'धारणक्षमता सिद्धांत' ही एक छोटीशी सुरवात आहे. या सिद्धांताचा विकास, विस्तार आणि मुख्य म्हणजे उपयोजन तेनियेच्या नंतर २५-३० वर्षांनी झालं. तेव्हा या सिद्धांतावर बरीच साधकबाधक चर्चा झालेली आहे.

(२) प्रतिक्रिया (१) क - Syntactic hierarchy किंवा वाक्यरचनेतली श्रेणिबद्धता ही संकल्पना २० व्या शतकात खूपच रुळलेली आहे. शिवाय आपण संस्कृतमधे एखाद्या नामाला / विशेषणाला एका विशिष्ट विभक्तीची 'अपेक्षा' आहे म्हणतो, तेव्हा आपण पदांचं अवलंबित्वच दाखवत असतो, ते तेनियेने उभ्या रेघेने दर्शविलं आहे.

(३) तेनियेने 'वाक्यां'चा (Sentences) चा विचार केला आहे. आता textlinguistics नुसार प्रचलित झालेल्या 'उद्‌गारांचा (Utterances) नाही. क्रियापदाचा वापर नसलेल्या 'उद्‌गारां'सारख्या रचनांचा जर्मन भाषावैज्ञानिकांनीही बराच ऊहापोह केलेला आहे.

(४) प्रतिक्रिया (३) अ,ब, क : या मुद्द्यांच्या संदर्भात 'वाक्यांग' या संकल्पनेकडे पुन्हा एकदा लक्ष वेधायला पाहिजे. तेनियेच्या सिद्धांतानुसार सर्व / वाक्यांगे समान दर्जाची आणि क्रियापदावर अवलंबून आहेत. वाक्यांगांच्या एकमेकांशी नात्याबद्दल तो बोलत नाही. 'वाक्यांग' ही संकल्पना कार्यावर (Function वर) अवलंबून आहे. त्यात किती आणि कोणत्या प्रकारचे शब्द येतील, हा मुद्दा असंबंधित रहातो. एक वाक्यांग हे एका शब्दाने किंवा एका सबंध वाक्याने बनलेले असू शकेल.




वरील उदाहरणात 'हे' आणि 'तू उद्या ये' ही एकेक 'वाक्यांगे' आहेत. शब्दांच्या जाती आणि त्यांचं एका दिलेल्या रचनेतलं कार्य (function) यात फरक करणे आवश्यक आहे. (जसे 'नाम' हे 'कर्ता' किंवा 'कर्म' असू शकते.)

(५) प्रतिक्रिया (४) अ : मूळ लेखात पान १० वर मध्यभागी असलेला परिच्छेद ('इथे एक गोष्ट...) नजरेतून सुटला असल्यास परत एकदा पहावा. वाक्यांगांची grammatical value आणि communicative value यात फरक करणे आवश्यक आहे.

(६) शेवटी एक महत्त्वाची गोष्ट सांगायला पाहिजे. या सिद्धांताचा जर्मन भाषा शिकण्यासाठी आणि शब्दकोश रचना करतांना कसा उपयोग केला गेला आहे, हे या लेखात मांडण्याचा प्रयत्न होता. जर्मन ही परकीय भाषा शिकतांना आणि शिकवतांना याचा खूपच फायदा होतो, असा माझा अनुभव आहे.

जर्मनमधे भाषावैज्ञानिकांनी ४९ महत्त्वाचे वाक्यप्रकार निश्चित केले आहेत. वाक्यांगांच्या जुळणीवरून असे वाक्यप्रकार निश्चित करणे, हा एक अत्यंत economic आणि practical मार्ग वाटतो.

एका नवीन दृष्टिकोनातून आपण मराठी वाक्यरचनांचा विचार करू शकू का? वाक्यांगांची जुळणी करून मराठीमधले वाक्यप्रकार सूत्ररूपाने मांडू शकू का? या प्रश्नांची चर्चा व्हावी, असा लेख लिहिण्यामागे हेतू होता. म्हणून लेखाच्या शेवटी चर्चेसाठी उदाहरणे दिली होती. त्यावरही प्रतिक्रिया मिळतील का?

□

**परकीय भाषा विभाग, पुणे विद्यापीठ,**
**रानडे इन्स्टिट्यूट, पुणे ४११००४**

५

# नाविक हाल (एक प्रतिसाद)

**मनोहर राईलकर**

'भाषा आणि जीवन' च्या उन्हाळा १९९५ (१३:२) अंकात पृ. २० वर श्री. नानासाहेब टिळक यांचा, याच शीर्षकाचा एक लेख प्रसिद्ध झाला आहे. 'नाविक हाल' हा शब्द मोठाच परिणामकारक आहे. आपण आपल्याच देशातील इतर प्रांतीयांचे असे नाविक हाल करीत असतो, असं माझ्या लक्षात आलं. सुमारे पंचवीस-सव्वीस वर्षांपूर्वी पंजाबात एक वर्ष राहण्याची संधी मला मिळाली. त्यावेळी तिथली खरी नावं ऐकून मी चकितच झालो. काही नावं इथं दिली आहेत. माझ्या मते आपल्याला मूळ नावं बरोबर माहीत नाहीत याचं मुख्य कारण आपण निरनिराळ्या प्रांतांतले लोक परस्परांशी फक्त इंग्रजीवाटेच संपर्क साधतो. थेट संपर्क साधण्याचा प्रयत्न करीत नाही. थोडक्यात, इंग्रजांनी आपले जे नाविक हाल केले आहेत ते आणि ते करण्याची जी सवय लावली आहे ती, दोन्ही आपण तसेच चालू ठेवले असावेत. पुढे काही उदाहरणं दिली आहेत.

थंड हवेचं सुप्रसिद्ध ठिकाण सिमला नसून शिमला आहे. पंजाबातील मोठं धरण भाकरा नसून भाखडा आहे. आणि जवळच्या गावाचं नाव नानगल नसून नंगळ आहे. पुढं काही नावं दिली आहेत. आपण करीत असलेले चुकीचे उच्चारही (कंसात) दिले आहेत. मदनलाल ढींग्रा (धिंग्रा), पटौदी (पतौडी), ढील्लों (धिल्लन), ढवण (धवन), पटियाळा (पतियाला), हरियाण (हरयाना) (ह्या कृष्णाच्या, म्हणजेच हरीच्या यानाचा मार्ग ह्या प्रदेशातून जात होता. म्हणून ह्या प्रदेशाचं नाव हरियाण. 'र' मुळं 'न' चा 'ण' होतो. हे संस्कृत-जाणकारांना माहीतच आहे.), चंडीगढ (चंदीगड) (जवळच चंडीदेवीचं मंदिर आहे. मी पाहिलं आहे.) माझ्या मागच्या एका लेखात (१४/२, उन्हाळा १९९६ मूळ मुद्रण प्रतीत असलेलं चंडीगढ (ड) हे नाव मुद्रितशोधकांनी दुरुस्त (?) करून चंदीगड असं छापलेलं पाहिलं तेव्हा हा रोग किती खोल जाऊन बसला आहे, त्याची कल्पना आली.

इंग्रजीत 'त' आणि 'ट' वर्ग वेगळे नाहीत, हे बहुधा, त्याचं कारण असावं. बरेचसे नाविक हाल, इंग्रजीतल्या ह्या त्रुटीमुळंच होत असल्याचं आढळून येतं. त्यामुळं तात्यांचं आडनाव तोपे असं मराठी वृत्तपत्रांतही वाचावं लागतं. नावांतील 'ट' वर्गाऐवजी'

'त' वर्गीय व्यंजनांचा वापर केला जात असल्यानंच बहुधा वरच्या परिच्छेदाती
नाविक हाल उद्भवले असावेत. अर्थात, काही प्रमाणात हिंदीतही ही त्रुटी आहेच
त्यामुळंच (मराठीप्रमाणं) पंजाबीतले जाणा, करणा, इ. धातू 'ण' कारान्त अस
हिंदीत जाना, करना असे नकारान्त दिसतात. आणि पुणे हे नाव पुने असं वाचा
लागतं. तद्वतच थडाणी, असराणी, बिजलाणी, अडवाणी, इत्यादी अचूक सिं
नावांऐवजी थडानी, असरानी, बिजलानी, अडवानी, वगैरे नावं प्रचारात आली असावी

इंग्रजी आणि हिंदीतही 'ळ' नाही. ह्याचाही परिणाम झाला असणार. म्हण
तर काले (ळे), जोगले (ळे) कर, गोले (ळे) इ. प्रकारे मराठी नावांचेही आप
हाल करतो. इंग्रजीत अ आणि आ यांच्यासाठी वेगळे स्वर नाहीत. त्यामुळंच
(गोखले अर्थ-राज्य-शास्त्र संस्थेचे माजी संचालक) यांच्या नावाचा उच्चार (पुण्यातह
राथ असा होत असे, हे मी अनुभवलं आहे. तसंच, कश्मिरी (काश्मिरी नव्हे)
(किंवा दर?) ह्या आडनावांचा उच्चारही आपण धार करतो. मराठी वसपटेचं वास
होऊ शकतं. गावसकरच्या नावाचा उच्चार पुण्यातल्या वृत्तपत्रांनीही गवासकर अ
केलेला वाचून कपाळावर हात मारून घेण्यावाचून काय करणार?

इंग्रजीत a चा उच्चार ए असाही होतो. पण बंगालीमधल्या रायचं इंग्र
स्पेलिंग Ray होतं म्हणून आपणही त्या नावाचा उच्चार रे (उदा. प्रफुल्लचंद्र) अ
का करावा?

पुष्कळ प्रांतांत तुकडे करून आद्याक्षरं लिहिण्याची प्रथा (इंग्रजीच
सोयीसाठी?) आहे. देवकीनंदन ह्या नावाकरता D.N. सुमतीप्रसाद ह्या नावाकर
S-P, वगैरे. पण जेव्हा ह्या प्रथेनुसार बटुकेश्वरचे तुकडे बटु आणि केश्वर करून इंग्रज
B-K किंवा नित्यानंदचे तुकडे नित्या आणि नंद करून N-N असं वाचावं लागतं ते
हातच टेकण्याची पाळी येते. हे नाविक हाल विलक्षणच म्हणायचे!

भारतीय नावांप्रमाणंच इंग्लंडव्यतिरिक्त बाकीच्या देशांतील नावांचेही आप
हाल करीत असतो. त्याचंही कारण आपण जगाकडेही फक्त इंग्रजीच्याच खिडकी
पहात असतो, हे असावं. त्या त्या देशांतील लोकांच्या आणि स्थानांच्या नाव
नेमके उच्चार समजून घेऊन आपण तसे करायला हवेत, असं नाही वाटत? Pa
हे नाव आपण इंग्रजीप्रमाणं पॅरिस असं उच्चारण्याऐवजी मुळातल्याप्रमाणं पारी अ
का उच्चारू नये? हा एक निराळ्या लेखाचा विषय आहे. तेव्हा तूर्त पुरे.

गजांजली, ४६ वाळवेकर इस्टेट, पुणे ४११ ०

# शास्त्रीय लेखनातील शैथिल्य

[परीक्षित ग्रंथ - मराठीचे व्याकरण, लेखिका - डॉ. लीला गोविलकर, प्रकाशक -मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे ३०, प्रथमावृत्ती-ऑक्टोबर १९९३, मूल्य १०० रु.]

**परीक्षणलेखक - माधव ना. आचार्य**

**(१) अथ....**

प्रस्तुत ग्रंथांच्या मलपृष्ठ चारवर.लेखिकेविषयी डॉ. दत्तात्र(त्रे) य पुंडे म्हणतात, "... 'व्याक्रियते अनेन इति व्याकरणम् -' या व्याख्येचा अर्थ लक्षात घेऊन डॉ. लीला गोविलकर यांनी प्रस्तुत ग्रंथात मराठी भाषेचे व्याकरण सिद्ध केल्याचे दिसेल. मराठीच्या विद्यमान प्राध्यापकांमध्ये व्याकरणशास्त्राचा मूलभूत अभ्यास करणाऱ्या प्राध्यापकांची संख्या हाताच्या बोटांवर मोजता येईल, इतकी अत्यल्प आहे. डॉ. लीला गोविलकर यांचा समावेश या अत्यल्प प्राध्यापकांत होतो."

डॉ. गोविलकरांनी इ.स. १९७४ मध्ये मराठी व्याकरणावर प्रबंध लिहून मुंबई विद्यापीठाची पीएच्.डी. पदवी मिळविली आहे. त्याच वर्षी 'मराठीचे व्याकरण' याच नावाचा त्यांचा ग्रंथ प्रसिद्धही झालेला आहे. (१९७४ मधील या ग्रंथाचा उल्लेख यापुढे 'मव्या १' असा करू.)

प्रस्तुत १९९३ मधील परीक्ष्य ग्रंथ (यापुढे प्रस्तुत - 'प्र' म्हणून उल्लेख करू.) हा गोविलकरांनी त्यांच्या प्रबंधातील संशोधनाचा मागोवा घेत लिहिलेला असणे स्वाभाविक आहे. म्हणूनच **'भूमिका'** नामक प्रास्ताविकात त्या म्हणतात, 'मराठीची व्याकरणे, त्यांच्यामधील बदल, मतप्रवाह व या विविध मतमतांतरांमधून मराठीच्या रचनेचे जाणवलेले वेगळेपण लक्षात घेण्याचा प्रयत्न या पुस्तकात केलेला आहे. त्यामुळे या लेखनात काही प्रमाणात मराठी व्याकरणाचा इतिहास व काही प्रमाणात मराठी व्याकरण - लेखनाची समीक्षा येणे स्वाभाविक आहे.'

अशा या ग्रंथाचा परिचय करून घेण्यासाठी परीक्षणाचा हा नम्र प्रपंच आहे.

## २) प्रथमावृत्ती की परिवर्धित आवृत्ती ?

**२.१) 'मव्या १' व 'प्र'** - प्रथम विभागात लेखिकेच्या 'मराठीचे व्याकरण याच नावाच्या १९७४ मधील ग्रंथाचा उल्लेख केलाच आहे. त्या आवृत्तीचा हेतू लेखिकेने तेथील प्रास्ताविकात म्हटल्याप्रमाणे ... एम.ए. च्या परीक्षेच्या दृष्टीने विद्यार्थ्यांना या प्रश्नपत्रिकेसाठी आवश्यक असलेली सर्व माहिती एकत्र करणे' हा होता. त्यामुळे तेथे 'व्याकरणविषयक स्वतंत्र किंवा मूलभूत संशोधनाची अपेक्षा करणे योग्य ठरणार नाही.' असेही लेखिकेने तेथे नमूद केले होते. (मव्या १-५)

अर्थात प्रस्तुत ग्रंथात तशी अपेक्षा करणे अयोग्य ठरू नये. मात्र या ग्रंथाची ही प्रथमावृत्ती असल्याचा दावा केलेला असला तरी 'मव्या १/ची परिवर्धित आवृत्ती वाटावी, एवढे सख्य या दोन ग्रंथांमध्ये आहे. ही परिवृद्धी 'मव्या -१' मधील प्रत्येक प्रकरणाला काही अधिक मजकुराची व निष्कर्षांची जोड देण्यापुरती मर्यादित आहे. बाकी लेखनप्रमाद, माहितीच्या नोंदीतील चुका, दुर्लक्षजन्य घोटाळे या बाबतींत दोन्ही आवृत्त्या समान आहेत. शिवाय १९७४ व १९९३ या दरम्यान जे अन्य महत्त्वाचे व्याकरणग्रंथ प्रसिद्ध झाले. त्यांतील मतांची दखल लेखिकेने कुठेही घेतल्याचे जाणवत नाही. त्यामुळे अनेक प्रमादस्थळे पुनरावृत्त झाली आहेत.

**(२.२) दुर्लक्षजन्य लेखनदोष** - 'मव्या - १' चे परीक्षण करताना **'आलोचना'** (डिसेंबर १९७५) च्या अंकात त्यामधील अनेक लेखनदोषांचा उल्लेख केला होता. उदा. दामले, सहस्रबुद्धे, ग्रामोपाध्ये, फडके इ. विशेषनामांची सविभक्तिक रूपे 'दामलेंनी' इ. प्रकारे 'या' कारान्त सामान्य रूपांशिवाय भेटतात, तेव्हा ती समर्थनीय ठरत नसल्याचा उल्लेख प्रस्तुत परीक्षणात केला होता. त्यानंतर प्रा. कृ. श्री. अर्जुनवाडकरांनीही आपल्या १९८७ च्या ग्रंथात 'मव्या - १' चा परिचय करून देताना गोविलकरांच्या या 'असामान्य' मराठीचा उल्लेख केला होता. (अर्जु/वाद-२८) लेखिकेने या टीकेकडे दुर्लक्ष केल्यामुळे प्रस्तुत ग्रंथातही ही असामान्य रूपे तशीच भेटतात.

संदर्भग्रंथांची सूची देतानाही 'मव्या' चीच यादी फक्त चार ग्रंथांची भर घालून प्रस्तुत ग्रंथात येते. त्यामुळे तेथील ग्रंथनामाची चूकही येथे पुनरावृत्त होते. उदा. प्रियोळकर संपादित दादोबांच्या आत्मचरित्र व चरित्राचे मूळ नाव "दादोबा पांडुरंग : आत्मचरित्र आणि चरित्र' असे असताना दोन्ही ठिकाणी ते 'दादोबा पांडुरंगी' असे दिलेले आहे. (मोरोपंतांच्या श्लोककेकावलीवरील दादोबांची 'यशोदा पांडुरंगी' ही टीका प्रसिद्ध आहे. त्या नावाशी या नावाचा घोटाळा होण्याचा संभव नाकारता येत नाही.)

'मव्या-१' प्रमाणे प्रस्तुत ग्रंथातही अनेक मुद्रणदोष आहेत. त्यातील काही पुनरावृत्त आहेत.

लेखनदोषांमागील दुर्लक्ष काही वेळा वाचकांचा गोंधळ होईल अशी विधाने कशी खपवून घेते याचे उदाहरण म्हणून 'मव्या - १' च्या उपरोक्त परीक्षणात पुढील वाक्य दिले होते, '**विशेषणाला** विभक्तिप्रत्यय लागल्यास विशेषणाचे फक्त सामान्यरूप होते.' (मव्या -१ - १४२) येथे '**विशेष्याला**' असे हवे. प्रस्तुत ग्रंथात उपरोक्त विधान असलेला संपूर्ण परिच्छेद तसाच उतरून घेतलेला असल्यामुळे ही चूकही पुनरावृत्त झाली आहे. (प्र.-१९०)

**(२.३) ऐतिहासिक माहितीच्या नोंदींमधील चुका**

'मव्या -१' मध्ये 'मराठी व्याकरणाची परंपरा' नामक पहिल्या प्रकरणात पूर्वव्याकरणांची माहिती देताना महानुभावीय परंपरेतील 'द्वात्रिंशल्लक्षणरत्नाकर' या ग्रंथाचा व रामदासशिष्य गिरिधरस्वामींच्या 'व्याकर्ण' नामक ग्रंथाचा निर्देश लेखिका करते (मव्या -१-२). प्रस्तुत ग्रंथातही हे निर्देश आहेतच (प्र -३). वस्तुतः या दोन आवृत्त्यांच्या मधल्या काळात या ग्रंथांविषयी तज्ज्ञांनी काय म्हटले आहे, हे लेखिकेने लक्षात घेणे आवश्यक होते.

'द्वात्रिंशल्लक्षणरत्नाकर' या ग्रंथाचा व्याकरणाशी काहीही संबंध नाही, हे डॉ. शं.गो. तुळपुळ्यांच्या माहितीवरून स्पष्ट होते. (तुळ - २४४) ही वस्तुस्थिती प्रा. अर्जुनवाडकरांनीही नोंदली आहे (अर्जु / इ. ३-४). त्याचप्रमाणे गिरिधरस्वामींच्या 'व्याकर्ण' ग्रंथाचा **मराठीशी** काही संबंध नाही (अर्जु / वाद-३). या माहितीकडे दुर्लक्ष केल्यामुळे प्रस्तुत ग्रंथात 'मव्या -१' मधील चुका पुनरावृत्त झाल्या आहेत.

**(२.४) उद्धरणातील प्रमाद**

अन्य व्याकरणकारांची मते उद्धृत करताना अपुरेपणा वा चूक कशी राहून जाते हेही आता एका उदाहरणाच्या आधारे लक्षात घेऊ.

'मव्या -१' मध्ये संबोधनाचा विचार करताना गोविलकर लिहितात, ''ही विभक्ती मानू नये असे मत पाटिलांनी मांडले आहे. तिला कारकार्थ नसूनही ती विभक्ती मानण्याची कारणे पुढीलप्रमाणे आहेत -

१) संबोधनाला स्वतंत्र प्रत्यय आहेत. एकवचन '०', आ, या, इत्यादी.

२) विभक्ती प्रत्ययांची जवळजवळ सर्व लक्षणे संबोधनाला लागू पडतात.

३) ते चरम प्रत्यय आहेत.

४) संस्कृतमध्ये त्याचा समावेश प्रथमेमध्ये केलेला असला, तरी केवळ ती परंपरा पाळण्याच्या दृष्टीमध्ये मराठीतूनही ती विभक्ती टाळावी असे नाही.

५) त्याचे ज्या वाक्यगत घटकपदाशी अव्यय होतो, ते पद कोणत्याही विभक्तीमध्ये येऊ शकते -

उदा. १) नारायणराव, किती मनापासून गाता तुम्ही - प्रथमा

२) सुधा, तुला पहायला मंडळी आली आहेत - द्वितीया

इत्यादी प्रकारच्या वाक्यांमध्ये संबोधन वेगवेगळ्या विभक्तींशी जुळते. त्यांना विभक्ती न मानायला पाटिलांनी दिलेली कारणे पुढीलप्रमाणे....'' (मव्या - १-१३०)

हा परिच्छेद जसाच्या तसा यातील अशुध्द लेखनापासूनच्या सर्व घोटाळ्यांसह प्रस्तुत परीक्ष्य ग्रंथातही येतो. (प्र. - १७८)

हे घोटाळे उपरोक्त 'आलोचने' तील परीक्षणात दाखविले होते. तरीही ते येथे पुनरावृत्त होतात. ते असे.

अ) या परिच्छेदातील पहिल्या वाक्याचा संबंध एकदम शेवटच्या वाक्याशी येतो. मध्येच येणारा भाग विरुद्ध मतनोंदीचा आहे. वाक्यात जशी पदांची तशी परिच्छेदात विचारांची आसत्ती नको का?

ब) क्र. ५ नंतरचे पुढील वाक्य दुरुस्त केले तर ते असे होईल -

'त्याचा ज्या वाक्यागत घटकपदाशी अन्वय होतो...'

या अंकाखाली दिलेली वाक्ये १) नारायणराव,.... २) सुधा,.... व तत्संबद्ध विवेचन मंगरूळकरांचे (मंग-१४४). परंतु गोविलकर तसा निर्देश करीत नाहीत. उपरोक्त आसत्तिविप्रयोग लक्षात घेतला नाही, तर ते कुणाला पाटलांचेच वाटेल.

क) यातील महत्त्वाचा घोटाळा असा की, मंगरूळकरांनी दिलेली उपरोक्त उदाहरणे, 'संबोधनाचा विभक्तीत **समावेश करू नये**' या मताच्या समर्थनार्थ आहेत. गोविलकर येथे ती नेमक्या उलट्या मताच्या (समावेश करावा) समर्थनार्थ दिली गेल्याचे नोंदतात.

या घोटाळ्याचे कारण असे असावे की, मुळात डॉ. ग. मो. पाटील यांनीच हा घोटाळा केला आहे. गोविलकर त्याचा पत्ता देत नाहीत, तो असा आहे ('मराठीचे विभक्तिप्रकरण' डॉ. ग. मो. पाटील-दामले व्याकरण पुरवणी - यंदे प्रत-१९६५-पृ. ३९)

उद्धरणातील प्रमादांची परंपरा कशी तयार होते हे यावरून लक्षात येईल. व 'मव्या -१' व 'प्रस्तुत ग्रंथ' यांचे प्रमादसख्यही जाणवेल.

**(२.५) चिकित्सेकडे दुर्लक्ष**

ज्या ग्रंथांचा आधार गोविलकर घेतात त्यांच्या आवृत्त्याही त्या नीट पाहत नाहीत. दामल्यांच्या व्याकरणाची केवळ १९६५ मधील पुरवणीसह असलेली यंदे प्रत त्यांनी सर्वत्र वापरलेली दिसते. १९७० मधील अर्जुनवाडकर संपादित प्रत त्यांनी निदान पाहिली असती तरी कितीतरी प्रमादस्थळे त्यांना टाळता आली असती. उदा. द्वंद्व समासाची माहिती देताना दामले 'एकशेप द्वंद्व' असा उपविभाग संस्कृतात असल्याची नोंद करतात. (दाम/पु ६१४) व (दाम / अ ४९८). दामल्यांचे हे विवेचन (त्यांचा उल्लेख न करता) गोविलकरांनी तसेच उतरून ठेवले आहे. (मव्या - १ - १०५; प्र - १४९) वस्तुतः उपरोक्त अर्जुनवाडकरसंपादित

प्रत त्यांनी पाहिली असती तर येथील तपशीलाची चूक राहिली नसती. तेथे अर्जुनवाडकर आपल्या संपादकीय टिपणांमध्ये 'एकशेष हा समास नसून एक स्वतंत्र वृत्ती असल्याचे नोंदतात. (दाम / अ-८०९)

**'समास - अभ्यस्त शब्द' (समस्त - अभ्यस्त?)** हे प्रकरणही 'मव्या -१' मधून प्रस्तुत ग्रंथात जसेच्या तसे उतरून घेतलेले आहे. त्यामुळे येथेही प्रमादांची पुनरुक्ती आहेच. यातील बव्हंश उदाहरणे दामल्यांची. पुन्हा येथेही यंदे प्रत अनुसरलेली. त्यामुळे दामल्यांचे दुर्लक्ष तसेच अनुसरलेले आहे. अर्जुनवाडकर प्रत पाहिली असती तर येथील दामल्यांचे घोटाळे लक्षात आले असते.

**(२.६) नवीन किती?**

'मव्या -१' व 'प्र' यांच्या नातेसंबंधाच्या या विभागात शेवटी थोडी तपशीलाची नोंद करू.

- 'वीस' ही प्रकरणसंख्या दोन्हीकडे समान.

- 'प्रकरणनामे' - अत्यल्प फरक वजा करता दोन्हीकडे समान.

- मजकूर - प्रकरणे १०,११, १२, १४, १७, १८ व १९ मध्ये दोन्हींकडे समान.

- मजकूर - आद्यन्ती थोड्या माहितीची भर घालून प्रकरणे १ व २० मधील समान

- आद्यन्ती वा अधेमधे माहितीची जोड दिलेली प्रकरणे - २, ४, ५, ६, ७, ९ व १५.

- बदलेले निष्कर्ष - प्रकरणे - ३, ८, १३ व १६

हा तपशील लक्षात घेतला की प्रस्तुत ग्रंथ ही प्रथमावृत्ती की 'मव्या' ची परिवर्धित आवृत्ती हे ज्याचे त्याने ठरवावे.

**(३) परिवृद्धीतील शैथिल्य**

(३.१) प्रस्तुत ग्रंथातील परिवर्धनातही जे शैथिल्य आहे त्याचे एक उदाहरण प्रथम घेऊ.

'मव्या -१' व 'प्र' मध्ये पंधरावे प्रकरण हे आख्यातविचाराचे आहे. प्रस्तुत ग्रंथात त्याच्या आरंभी जी भर आहे ती अशी -

''संस्कृतमध्ये वर्तमानकाळाचे **तीन** प्रकार, भूतकाळाचे तीन प्रकार व भविष्यकाळाचे दोन प्रकार, आज्ञार्थ व विध्यर्थ असे प्रत्ययांचे गट दिसतात. शिवाय परस्मैपदी व आत्मनेपदी प्रत्ययांची विभागणी वेगळी. (शिवाय प्रथम ते दशम गणांपर्यंतच्या धातूंच्या विभागणीत प्रत्येक गणाला एखादे दर्शक अक्षर उदा. प्रथम गण - अ, **षष्ठी** गण - अ, चतुर्थ, दशम गण. अव, इ -) यामुळे धातूला लागणाऱ्या प्रत्ययांची संख्या विभक्तिप्रत्ययांच्या संख्येप्रमाणे विपुल होती.'' (प्र-२०१)

- आता पहिली गोष्ट अशी की मराठीच्या आख्यातांच्या चर्चेत ही माहिती देण्याचे काही कारण नव्हते. दुसरी म्हणजे ती द्यावयाचीच होती तर अचूक देणे आवश्यक होते. या माहितीतील शैथिल्ये कुणाच्याही सहज लक्षात येण्यासारखी आहेत.

१. वर्तमानकाळाचे **तीन** प्रकार कोणते?

२. या यादीत संकेतार्थ व आशीरर्थ नाहीत.

३. **षष्ठी** गण की **षष्ठ** गण?

४. चतुर्थ व दशम गणांची गणविकरणे अनुक्रमे 'य' व 'अय' असताना दोहोंचे 'अव' हे एकच अवलक्षण कुठून आले? (का या साऱ्या चुका मुद्रकाच्या?)

अशाप्रकारचे शैथिल्य प्रस्तुत आवृत्तीत अन्यत्र भेटते. उदा. मराठीच्या वर्णमालेचा विचार करताना 'ए' व 'ओ' यांना मूलध्वनी या कसोटीनुसार स्वरत्व दिले जाते (प्र - ४९). परंतु पुढे मान्य स्वरांची यादी देताना 'ओ' गायब होतो (प्र - ५३).

केलेले विधान व दिलेली उदाहरणे यात संगती नको काय? परंतु या साध्या गोष्टीकडेही दुर्लक्ष होते. उदा. 'ह्' व 'य्' चा विचार करताना 'सामान्यरूप करण्याच्या मराठीच्या लकबीचा हा परिणाम असावा.' असे सांगून गोविलकर सामान्यरूपाची माहिती देतात. (प्र - ५९). आता येथे 'य्' ची चर्चा चालू आहे. तर मग 'या' कारान्त सामान्यरूपाची उदाहरणे देणे योग्य नाही काय? परंतु त्या उदाहरणे देतात. राम - रामाला, तलवार - तलवारीपासून, गदा - गदेने.

- या संदर्भात उदाहरणे देऊन जागा अडविण्यात काही अर्थ नाही.

**(४) मतसंकलनाचे स्वरूप**

व्याकरणातील सर्वच विषयांचा मागोवा घेताना गोविलकरांनी पूर्वसूरींच्या मतांचे संकलन 'मव्या - १' मध्येही केले होतेच; व 'ते बरे असल्याचा' निर्वाळा दिला गेला आहे. (अर्जु / वाद -२८, अर्जु / इ - ३१६) प्रस्तुत ग्रंथातही हे संकलन थोडीफार भर घालून येते. त्यासाठी नेमके कोणते ग्रंथकार उपयोगी पडले आहेत, हे मात्र शोधावे लागते. कारण गोविलकर उद्धृत मतांचे नेमके पत्ते देण्याचे पथ्य क्वचित पाळतात.

ऐतिहासिक माहितीची नोंद करतानाही काटेकोर विधानांची काळजी घ्यावी लागते. कारण आज पूर्वीचे काही ग्रंथ दुर्मीळ होत आहेत. त्यामुळे मूळ ग्रंथ पाहता न आल्यामुळे उद्धरणावर विश्वास ठेवणाऱ्या वाचकाचा गैरसमज होऊ शकेल. उदा. गुंजीकरांविषयी गोविलकर लिहितात, "त्यांनी चिपळूणकरांचे लेख पाहिलेले **नसूनही** त्यांचे विचार चिपळूणकरांच्या विचारांशी फार मोठ्या प्रमाणात जुळणारे आहेत."

(प्र-११)

आता गुंजीकरांचे मूळचे विधान जर नीट पाहिले नाही, तर त्यांनी चिपळूणकरांचे लेख कधीच पाहिले नव्हते, असे वाटणे शक्य आहे. परंतु याबाबत वस्तुस्थिती वेगळी आहे. गुंजीकरांनी जेव्हा 'विस्तारा' मध्ये रा.भि.जोश्यांच्या व्याकरणावर परीक्षणात्मक लेख लिहिण्यास सुरुवात केली तेव्हा अगदी सुरुवातीला त्यांना चिपळूणकरांचे लेख उपलब्ध होत नव्हते. परंतु नंतर त्यांना ते मिळाले. स्वत: गुंजीकरांनी हे स्वच्छपणे नोंदले आहे. (गुंजी ३१५ पादटीप)

मत नोंदताना मूळ लेखकाचे म्हणणे अचूक देण्याची जबाबदारी येते. याबाबतीत मूळ लेखकाचे मत नेमके विरुध्दार्थी कसे दिले जाते हे संबोधनाच्या संदर्भात पूर्वी नोंदलेच आहे. (पहा - परिच्छेद - २.४)

मतनोंदणीत अपुरेपणाही चालत नाही. उदा. संशयार्थाची माहिती देताना गोविलकर राजवाड्यांच्या 'चा' व 'णे' या आख्यातांचा उल्लेख करतात. (प्र - २१०) येथील 'णे' आख्यात आर्ष म्हणून बाजूला ठेवले तरी 'चा' बद्दलचे राजवाड्यांचे म्हणणे पूर्णपणे मांडायला हवे होते. गोविलकर तसे न करताच ते खोडून काढतात. वस्तुत: राजवाड्यांनी 'चा' आख्याताची तिन्ही लिंगी, तिन्ही पुरुषी उभयवचनी रूपे दिली आहेत. (राज / ति ६२-६३) त्यामुळे दामल्यांनी 'णार' च्या संदर्भात केलेल्या चर्चेनुसार (दाम / अ-५९५) 'चा' हे कृदन्त न ठरता आख्यात ठरते.

**(५) निष्कर्षांची चिकित्सा**

व्याकरणाच्या प्रत्येक विषयावर पूर्वसूरींची मते नोंदल्यानंतर गोविलकर स्वत:चे मत नोंदतात. त्यांपैकी **फक्त काहींची** चिकित्सा करू.

**(५.१) व्याकरणाची कक्षा व वाक्यमीमांसा** - व्याकरणाची कक्षा ठरविताना गोविलकर म्हणतात, 'प्रयोगविचार हा व्याकरणातील अखेरचा भाग आहे. प्रयोगविचार व वाक्यपृथक्करण यांच्यातील फरक लक्षात न घेतल्याने व्याकरणाच्या कक्षेत वाक्यपृथक्करण घुसले आहे... वाक्यपृथक्करणाच्या विचाराला व्याकरणाच्या कक्षेत केवळ आगंतुकाचेच स्थान द्यावे लागते. (प्र. ३६)

अशा या आगंतुक विषयाला गोविलकरांनी एक स्वतंत्र प्रकरण दिले आहे. त्यात प्रथम वाक्यमीमांसेविषयी आगरकर, दामले, सबनीस अशांची मते देऊन पुढे गोविलकर म्हणतात, 'वाक्यमीमांसा हा व्याकरणाचा भाग नव्हे' (प्र. २४९)

नंतर या आपल्या विचाराला मुरड घालून मराठी वाक्यरचनांच्या पृथक्करणाचा विचार दामल्यांप्रमाणेच त्या सविस्तर मांडतात. (प्र. २५० ते २६७)

ही मुरड कशासाठी ? तर 'वाक्यमीमांसेमध्ये व्याकरणाने व्यक्त केलेली रूपदृष्टी व तर्कशास्त्राने सांगितलेली अर्थदृष्टी यांचा समन्वय साधलेला असतो.' (प्र - २४९)

या समन्वयामुळे व्याकरणाला काही फायदा होतो काय, याचे उत्तर दामल्यांप्रमाणेच गोविलकरांजवळही नाही.

खरे म्हणजे वाक्यपृथक्करणाची व्याकरणाला मदत तर होत नाहीच, उलट ते अकारण पर्याकुल मात्र होते. म्हणून व्याकरणशास्त्राची कक्षा सांगताना जी भूमिका गोविलकरांनी घेतली आहे, तिचाच पाठपुरावा करणे योग्य होते. निदान या आधीच्या 'प्रयोगविचार' या प्रकरणातील स्वतःच्या, 'व्याकरणामध्ये वाक्यपृथक्करण शास्त्राची कल्पना येण्याची काही गरज नाही.' या निष्कर्षाला (प्र. २४१) त्या चिकटून राहिल्या असत्या तरी बराच खटाटोप वाचला असता.

**(५.२) शब्दजातिविचार -** शब्दांच्या वर्गीकरणाच्या संदर्भात गोविलकर येस्पर्सनच्या रूप, कार्य व अर्थ या निकषांना मान्यता देतात. त्यातही रूप प्रधान व अर्थ-कार्य हे दुय्यम निकष असल्याचे त्या सांगतात (प्र- ७६). या तत्त्वानुसार प्रातिपदिक, अव्यय व धातू हे तीन शब्दवर्ग त्या सांगतात. (प्र - ७६ ते ७८)

यापुढचा प्रश्न अष्टशब्दवर्गाच्या व त्यातील उपभेदांच्या शास्त्रीयतेचा आहे. याबाबत मराठी व्याकरणांत जो घोळ घातला गेला आहे त्याचे थोडेफार दर्शन गोविलकरांच्या आढाव्यात घडते.

मात्र या घोळातून मार्ग काढणे शक्य न झाल्यामुळे गोविलकरांना अनेकवेळा धरसोड करावी लागली आहे. उदा. सर्वनामविषयक चर्चेचा समारोप (प्र - १०९) व क्रियाविशेषणाची व्याख्या (प्र - १३५). शब्दयोगीसारख्या शब्दजातीच्या विचारातील आव्हान त्यांनी अनुत्तरित ठेवले आहे. (प्र - १४२-४३)

या सर्व घोटाळ्याचे मूळ कारण असे आहे की, रूढ शब्दवर्गांपैकी काही पदतत्त्वानुसार तर काही पदान्वयतत्त्वानुसार मानावे लागतात. 'पदपदान्वयौ व्याकरणम्' किंवा 'शब्दांच्या जाती व शब्दांची नाती म्हणजे व्याकरण' हे तत्त्व एकदा नीट लक्षात घेतले की पददृष्ट्या विभक्तिप्रत्ययापेक्षी, आख्यातप्रत्ययापेक्षी व प्रत्ययानपेक्षी (प्रत्यय + अनपेक्षी) या तीनच शब्दजाती उरतात. मग व्याकरणाला शोध घ्यावा लागतो तो पदान्वयतत्त्वांचा. त्यामध्ये विशेषण - विशेष्य - भाव, व भावरूप आणि अभावरूप असा सामान्य संबंध असे प्रकार मिळतात. त्यांनुसार सर्वनाम, विशेषण, क्रियाविशेषण इत्यादी शब्दवर्ग शब्दजाती न ठरता शब्दांची नाती ठरतात.

याची जाणीव मराठी व्याकरणपरंपरेत चिपळूणकरांना थोडीफार झालेली असावी, असे त्यांच्या सर्वनाम व क्रियाविशेषण यांविषयीच्या विवेचनावरून म्हणता येते. (चिप २९ व १३८)

याचा अधिक विचार अलीकडें तपशीलवार केला गेला आहे. (अर्जु/वाद - ११८) व (आचा -४१)

**५.३) विभक्तिविचार -** याविषयीच्या प्रकरणात पूर्वसूरींची मते, स्वतःचे निष्कर्ष

व समारोपीतील विधाने या सर्वांचा मेळ साधून गोविलकरांना नेमके काय म्हणावयाचे आहे, हे समजावून घेणे हे फार अवघड कार्य आहे.

त्यांच्या विवेचनातील कित्येक विधाने ही मतनोंदीची की त्यांच्या निर्णयाची हे सहज कळत नाही. उदा. पंचमीचे विवेचन (प्र. १७७). संबोधनाविषयीचा त्यांनी केलेला गोंधळ पूर्वी नोंदलाच आहे. (परि. २.४)

विभक्ती प्रत्ययांवरून की अर्थांवरून याची चर्चा मांडून त्या तडजोडवादी भूमिका स्वीकारतात. म्हणून प्रत्ययवादी भूमिकेला अनुसरून द्वितीया व चतुर्थी यांपैकी एकच मानावी असे सुचवून अर्थवादी भूमिकेनुसार कर्मासाठी अप्रत्यय द्वितीया सांगतात (प्र-१७३).

गोविलकरांच्या विभक्तिविचारावर प्रयोगविचारातील संकल्पनांचे अकारण दडपण आलेले आहे. त्यामुळे त्यातील धातुरूपेश या संकल्पनेनुसार कर्तरी प्रयोगात त्या कर्ता प्रथमेत, कर्म अप्रत्यय द्वितीयेत तर कर्मणी प्रयोगात तेच कर्म प्रथमेत मानतात. (प्र-१८०)

हा घोळ एवढ्यावरच संपत नाही. यातूनच निर्माण होणाऱ्या सप्रत्यय व अप्रत्यय द्वितीयेविषयी त्या म्हणतात, 'सप्रत्यय द्वितीया अप्रत्यक्ष कर्मासाठी तर अप्रत्यय द्वितीया प्रत्यक्ष कर्मासाठी (पृ. १८०).

मात्र जेथे दोन कर्मे मुळातच नसतील तेथे एकच कर्म अप्रत्यय व सप्रत्यय अशा दोन्ही प्रकारे येऊ शकते त्याचे काय? त्यांच्या या घोळाचे मूळ असणाऱ्या रा. भि. जोश्यांनी दिलेली उदाहरणे घेऊ - गुराखी गाय / गाईस बांधतो (जोशी - कलम १५३). मुळातला जोश्यांचा हा सप्रत्यय - अपत्यय गोंधळ काढताना गुंजीकरांनी विचारले होते, ' (तर मग) सप्रत्यय व अप्रत्यय प्रथमा असे भेद जोशीबुवा का करीत नाहीत?' (गुंजी - ३०२) याचे तर्कशुद्ध उत्तर देता येणे कठीण आहे.

ही सर्व चर्चा केल्यानंतर त्यांनी मांडलेला विभक्तिव्यवस्थेचा आलेख असा आहे -

'प्रथमा - प्रत्यय नाही - कर्ता.
द्वितीया १) प्रत्यय नाही - प्रत्यक्ष कर्म.
२) स, ला, ते - प्रत्यय - अप्रत्यक्ष कर्म.
तृतीया - ने, ए, ई - प्रत्यय - कर्ता, करण
चतुर्थी - चा, त, ई, आ - प्रत्यय - कर्ता अधिकरण इ.'

(प्र - १८०)

कर्ता, कर्म, करण यांना रूढ विभक्ती देऊन गोविलकरांनी येथे रूढ षष्ठी व सप्तमी यांना चतुर्थी म्हटले आहे. या व्यवस्थेमुळे नेमके काय साधते ते कळणे

कठीण आहे. रूढ विभक्तींची क्रमवाचक नावे बदलल्यामुळे होणारा गोंधळ वेगळाच.

या सर्व विचारांमागील घोटाळा असा आहे, विभक्ती ही **पदसिद्धींची उपाधी** आहे, पदान्वयाचा विचार नंतर येतो, हे कुणी लक्षात घेत नाही. दामल्यांनी ही गोष्ट विभक्ती विमर्शात आपल्या पद्धतीने स्पष्ट केली आहे. (दाम/अ-२७८)

तसे हे तत्त्व दादोबांनाही जाणवले होते. म्हणूनच ते म्हणतात, 'विभक्ती म्हणजे कारकसंबंधाद्यर्थसूचक जे प्रत्यय, ते लागून जे रूप सिद्ध होते, त्या रूपाची संज्ञा होय, तदंतर्गत जे अर्थ आहेत त्यांची संज्ञा नव्हे.' (दादो - ६४)

येथे सूचित होणारे तत्त्व गोविलकरांनाही मान्य असावे. कारण आख्यातविचारात त्या प्रत्ययानुसारी भूमिकाच घेतात. मग विभक्तिविचारामध्येच ही भूमिका का सुटते? (पृ - २११)

प्रस्तुत प्रकरणाच्या अखेरच्या भागात गोविलकर पुन्हा रूढ विभक्तिव्यवस्थेनुसार प्रथमा ते सप्तमी विभक्तींनी व्यक्त केलेल्या कारकार्थांच्या व उपपदार्थांच्या याद्या उदाहरणांसह देतातच. हा पूर्वमतांचा संग्रह की त्यांना मान्य असणारा भाग?

**(५.४) संयुक्त क्रियापदाची चर्चा**

एतद्‌विषयक प्रकरणात प्रथम संयुक्त क्रियापदाविषयीची भाववाद्यांची व अभाववाद्यांची मते नोंदल्यानंतर गोविलकर भाववाद्यांच्या बाजूने पुढील युक्तिवाद करतात, "... संयुक्त क्रियापद मानले नाही तर कर्ता व कर्म याबद्दलची कल्पना सदोष राहते." 'शिपायाकडून चोर पकडला जातो' या वाक्यात पकडला जाणे हे संयुक्त क्रियापद मानले तर पकडला जाणारा चोर हे पद कर्ता, व संयुक्त क्रियापद मानले नाही तर पकडणारा शिपाई हे पद कर्ता ठरते..

'शिपाई चोर पकडतो' व 'शिपायांकडून चोर पकडला जातो' या दोन वाक्यांतील फरक लक्षात घ्यायचा असेल, तर संयुक्त क्रियापद मानणे आवश्यक ठरते."

गोविलकरांनी येथे जे वाक्य उदाहरणादाखल घेतले आहे तेच वाक्य पुढे प्रयोगविचारात 'नवीन कर्मणी' च्या समर्थनार्थ येते. तेथे त्या म्हणतात, "... 'पकडला जातो' या मध्ये मूळ धातू 'पकडला जाणे' हा नसून 'पकडणे' हाच आहे. म्हणून 'शिपायाकडून चोर पकडला जातो' या वाक्यामध्ये 'शिपाई' हाच कर्ता, 'चोर' हेच कर्म मानावे लागते." (प्र - २३४)

म्हणजे संयुक्त क्रियापद मानण्यासाठी 'चोर' हा कर्ता व 'नवीन कर्मणी' च्या समर्थनार्थ 'शिपाई' हा कर्ता - अशा त्रिसंगतीकडून गोविलकरांनी उगीचच स्वत:ला पकडून घेतले आहे.

वस्तुत: पद व पदान्वय या व्याकरणातील मूलभूत संकल्पना मानून पुढे गेले की तथाकथित संयुक्त क्रियापदाची कल्पना सोडून द्यावी लागते. शब्दाला

प्रत्यय लागून त्याचे पद बनले की त्याचा अवतार पूर्ण झाला. नंतर त्याचा अन्य पदांशी अन्वय सांगणे एवढेच काम उरते. त्या पदांचा संयोग तेथे अप्रस्तुत आहे.

**(५.५) प्रयोगविचार** - गोविलकरांचा प्रयोगविचार दामल्यांना अनुसरतो. त्यांनी दिलेली नावे ही त्यांना तर्कशास्त्रदृष्ट्या पटणारी वाटतात. (प्र. २२७) म्हणून त्यांचे अनुकरण करून व त्यात फक्त तीन वाक्यरचनांची भर घालून त्या एक प्रयोगतक्ता सादर करतात. (प्र. २२८) त्यामुळे दामल्यांच्या सोळा वाक्यरचना गोविलकरांच्या तक्त्यात एकोणीस होतात.

गोविलकरांची भर पुढीलप्रमाणे

१. दामल्यांनी प्रधानकर्तृक कर्मणीमध्ये मूलतृतीयान्त व पर्यायहीन चतुर्थ्यन्त अशा दोन्ही कर्त्यांचा विचार एकत्र केला आहे. (दाम/अ-६१८) गोविलकर त्यातील चतुर्थ्यन्त कर्ता बाजूला काढून एक वाक्यरचना वाढवितात. (प्र - २२९)

२. दामल्यांनी नवीन कर्मणीसारखा नवीन भावे मानलेला नाही. गोविलकर 'त्याला कधी पकडण्यात येईल, त्याचा नेम नाही' हे वाक्य नवीन भावे प्रयोगाचे म्हणून सादर करतात. (प्र - २३७)

(याची चिकित्सा करताना हे वाक्य दामल्यांनी **'कर्तृकर्मभावे'** चे उदाहरण दिल्याचे गोविलकर सांगतात. वास्तविक दामल्यांनी ते गौणकर्तृक कर्मभाव संकराचे म्हणून दिले आहे (दाम / अ - ६३२). हे दुर्लक्ष की मुद्रणदोष?)

३. गोविलकरांची तिसरी भर संकरात्म (ज्यांना गोविलकर दामल्यांप्रमाणेच संकीर्ण म्हणतात) प्रयोगांतील आहे. दामल्यांनी कर्तृकर्म, कर्मभाव व कर्तृभाव हे तीन संकर दिले आहेत. त्याबद्दलच्या चर्चेत दामले, 'त्याने आपल्या मुलीला सासरी पाठविलीन' असे एक वाक्य देतात. त्याच्या मते 'अशा प्रकारच्या रचनांतील क्रियापदाच्या अंती येणारा नकार नीकार व्याकरणदृष्ट्या महत्त्वाचा नाही.' (दाम / अ ६३२)

गोविलकरांना मात्र तो महत्त्वाचा (लिंगभेदक?) वाटतो. म्हणून त्या हे वाक्य **कर्तृकर्मभावे** संकराचे म्हणून देतात. (प्र - २४०)

गोविलकरांची ही भर चिकित्सेत टिकण्यासारखी नाही. पहिली केवळ दामल्यांची उदाहरणे फोडून येते. दुसरीत दामल्यांना वाटतो तसा कर्मणीचा अंश नाही व गोविलकरांना वाटते तसे नावीन्यही नाही. (तो शुद्ध भावे प्रयोग आहे. तेथे 'त्याला' हा चतुर्थ्यन्त कर्ता असून कर्म नाहीच.) तिसऱ्या वाक्यातील 'पाठविलीन्' मधला 'न्' गोविलकरांना लिंगभेदकारक वाटल्यामुळे कर्तृगामी वाटतो. परंतु तसा तो नाही हे सहज लक्षात येईल.

खरे म्हणजे, दामले काय वा गोविलकर काय प्रयोगविचारात वाक्यांची जी भरताड देतात ती चिकित्सेत टिकण्यासारखी नाही. प्रथम प्रधानकर्तृक व

गौणकर्तृक हाच भेद पाहू. 'प्रयोग म्हणजे कर्ता व कर्म यांचा क्रियापदाशी असणारा पुरुषादी संबंधातील अन्वय वा अनन्वय' हे लक्षण दामलेच देतात. (दाम / अ ६०८) म्हणजे हा रूपदृष्ट्या असणारा पदान्वय आहे. हा सांगितल्यानंतर भेद सांगण्यासाठी अर्थाला महत्त्व देणे हे वदतोव्याघाताचे आहे. मोडक म्हणतात, 'प्रयोग ही संज्ञा रूपप्रधान आहे. कर्ता व कर्म यांच्या अर्थप्रधान कमीजास्त महत्त्वाशी तिचा काहीएक संबंध नाही' (मोड २२९). हे व्यवस्थासूत्र लक्षात घेतले की दामल्यांनी दिलेले प्रधानकर्तृक कर्मणी व प्रधानकर्तृक भावे हे उपप्रकार निरस्त होतात.

दामल्यांचे पुराण कर्मणी व पुराण भावे हे उपप्रकारही जुन्या मराठीचे आहेत. विद्यमान मराठीला ते उपपन्न होत नाहीत.

नवीन कर्मणी, समापन कर्मणी व समापन भावे हे उपप्रकार तथाकथित संयुक्त क्रियापदांमुळे येतात. वस्तुतः वाक्यातील आख्यातप्रत्यययुक्त धातुरूप म्हणजे क्रियापद. कृदन्त हा क्रियापदाचा घटक नव्हे. म्हणून 'शिपायाकडून चोर धरला जातो' ह्या दामल्यांच्या नवीन कर्मणीमध्ये 'जातो' हे क्रियापद, तद्नुसारी 'चोर' हा कर्ता म्हणून तो कर्तरी प्रयोग; कर्मणी नव्हे.

समापन कर्मणी / भावे च्या समर्थनार्थ दामले जो विशेष अर्थाचा मुद्दा आणतात तोही गैर लागू आहे. कारण असे अर्थावरून भेद सांगू लागल्यास, 'बाळ बोलू लागला' हा **कौतुकर्कतरी** व 'बाळ रडू लागला' हा **वैतागकर्तरी** असेही उपप्रकार सांगावे लागतील.

दामल्यांचे शक्य कर्मणी व शक्य भावे हे उपप्रकार मूळ धातू व साधित धातू यांत विवेक न केल्यामुळे निर्माण झाले आहेत. 'मला काम करवते' येथे दामले 'कर' हाच धातू मानतात. वस्तुतः येथे 'करव' हा साधित धातू लक्षात घेऊन त्यावरून कर्ता शोधावा लागतो. तो 'काम' हा आहे; प्रयोग अकर्मक कर्तरी.

याप्रकारे चिकित्सा केल्यानंतर गोविलकरांनी मान्य केलेल्या दामल्यांच्या सोळा रचनांपैकी फक्त **नऊ** शिल्क राहतात. तद्नुसारी (१,२) सकर्मक, अकर्मक कर्तरी (३) कर्मणी (४,५,६) सकर्मक, अकर्मक, अकर्तृक भावे व (७,८,९) तीन संकरात्म असे नऊ प्रयोग मानून व्यवस्था लावता येते. (आचा - १३५-१३६)

**(६) ... इति**

पूर्वपरिच्छेदांमध्ये गोविलकरांच्या **फक्त काही** निष्कर्षांचीच थोडीफार चिकित्सा केली आहे. परंतु तेवढ्यावरूनही त्यांचे संशोधन व्याकरणशास्त्राच्या व्यवस्थासूत्रांपासून कसे दूर जाते हे सहज लक्षात येईल.

**संक्षेपांच्या वर्णानुक्रमे संदर्भसूची**

१) **अर्जु / इ** मराठी व्याकरणाचा इतिहास - कृ. श्री. अर्जुनवाडकर, १९९२.
२) **अर्जु / वाद** मराठी व्याकरण : वाद आणि प्रवाद - कृ. श्री. अर्जुनवाडकर, १९८७.
३) **आचा** - मराठी व्याकरण विवेक - मा. ना. आचार्य, १९९०
४) **गुंजी** - कै. रामचंद्र भिकाजी गुंजीकर यांचे संकलित लेख (प्रथम भाग) संपादक - काशीनाथ रामचंद्र गुंजीकर, १९४२.
५) **चिप** - मराठी व्याकरणावर निबंध - कृष्णशास्त्री चिपळूणकर (१८९३) दु. आ. १९७१.
६) **जोशी** - प्रौढबोध मराठी व्याकरण - रामचंद्र भिकाजी जोशी १८८९
७) **तुळ** - महानुभाव पंथ आणि त्याचे वाङ्मय - डॉ. शं. गो. तुळपुळे १९७६.
८) **दादो** - महाराष्ट्र भाषेचे व्याकरण - दादोबा पांडुरंग तर्खडकर (सातवी आवृत्ती १८७९) उद्धृत - अर्जु / वाद.
९) **दाम / अ** - शास्त्रीय मराठी व्याकरण - मोरो केशव दामले संपादक - कृ. श्री. अर्जुनवाडकर - १९७०.
१०) **दाम/पु** - शास्त्रीय मराठी व्याकरण - मोरो केशव दामले. पुरवणीसह - तिसरी आवृत्ती - सं. ग. वा. करंदीकर, (यंदे प्रत) - १९६५.
११) **प्र** - प्रस्तुत परीक्ष्य ग्रंथ.
१२) **मंग** - मराठीच्या व्याकरणाचा पुनर्विचार -अरविंद मंगरूळकर (१९६४) पुनर्मुद्रित आवृत्ती १९७८.
१३) **मव्या -१-** मराठीचे व्याकरण - लीला गोविलकर - १९७४.
१४) **मोड** - मराठीचे अंतरंगदर्शन - गोविंद कृष्ण मोडक - १९३२.
१५) **राज/ति** - 'तिङन्तविचार - विश्वनाथ काशिनाथ राजवाडे, राजवाडे लेखसंग्रह - भाग २ मध्ये संगृहीत - १९३२.

□

**मु. पोस्ट - चौल, ता. अलिबाग, जि. रायगड ४०२२०३**

# वर्ष १५, १९९७ ची लेखनसूची

## लेखकसूची

- / पत्रिकेबद्दल वार्षिक निवेदन (सूचनाफलक) / १५:१ हिवाळा १९९७ / ७२
- / मराठीतील भाषाविषयक लेखन : १९९६ / १५:१ / हिवाळा १९९७ / ६७
- / राजमा म्हणजे श्रावण घेवडा (साद आणि प्रतिसाद क्र. २) / १५:४ दिवाळी १९९७ / ५१
- / वर्ष १५, १९९७ ची लेखनसूची (पत्रिकासूची) १५:४ दिवाळी १९९७ / ७४

अर्जुनवाडकर लीला / मधाच्या घागरीच्या निमित्ताने / १५:४ दिवाळी १९९७ /३५

अर्जुनवाडकर लीला / लेणे, की लेणी ? (साद आणि प्रतिसाद) / १५:१ हिवाळा १९९७ / ६५

आचार्य मा. ना. / शास्त्रीय लेखनातील शैथिल्य (पुस्तक परीक्षण) / (परीक्षित पुस्तक - मराठी व्याकरण, लेखक लीला गोविलकर, मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे ३०, प्र. आ. १९९३, मूल्य १०० रु.) / १५:४ दिवाळी १९९७ / ६१

ऑडन विस्टॅन ह्यू / कांदबरीकार (धन परक्याचे) / अनुवादक - अशोक रा. केळकर / १५:१ हिवाळा १९९७ / ६०

ऑडन विस्टॅन ह्यू / लेखन (धन परक्याचे) / अनुवादक - नीलिमा गुंडी / १५:१ हिवाळा १९९७ / ४६

करंदीकर विंदा / संत ज्ञानेश्वरांचा अमृतानुभव : विंदा करंदीकरांची प्रतिक्रिया (पुनर्भेट) / १५:३ पावसाळा १९९७ / १८

कुलकर्णी द. भि. / भुसावळ (ज्याची त्याची प्रचीती) / १५:१ हिवाळा १९९७ / ६३





अनुक्रमणिका

केळकर अशोक रा. / कवींचे निरंकुशत्व : काही प्रतिक्रिया (साद आणि प्रतिसाद) / १५:३ पावसाळा १९९७ / ३७

केळकर अशोक रा. (अनुवादक) / कादंबरीकार (धन -परक्याचे) / मूळ लेखक - विस्टॅन ह्यू ऑडन, मूळ कविता - The Novelist / १५: १ हिवाळा १९९७ / ६०

केळकर अशोक रा. / लिहायचं तरी कशासाठी ? (संपादकीय) / १५:४ दिवाळी १९९७ / १

कोल्हटकर माधवी / वेद आणि मुठीत ? / १५:३ पावसाळा १९९७ / ४१

खेर शर्मिष्ठा / मराठी इंग्रजी संयुक्त पेपर (साद आणि प्रतिसाद) १५:३ पावसाळा १९९७ / ४०

गुंडी नीलिमा / कवितेतील भाषाव्यवस्थेशी निगडित प्रतिमासृष्टी / १५:३ पावसाळा १९९७ / २७

गुंडी नीलिमा (अनुवादक) / लेखन (धन परक्याचे) / मूळ लेखक - विस्टॅन ह्यू ऑडन, मूळ लेख - Writing / १५:१ हिवाळा १९९७ / ४६

गुंडी नीलिमा / वाढता वाढता वाढे / १५:४ दिवाळी १९९७ / ४४

जोशी वसंत स. / 'मऱ्हाटी संस्कृती : काही समस्या' : एक वाटचाल / १५:३ हिवाळा १९९७ / ३५

जोशी श्रीपाद / साजिंदा व बाजिंदा (शब्दायन) / १५:१ हिवाळा १९९७ / ६१

टिळक विद्यागौरी / अनुवाद, की अनुवादाचे विडंबन ? (पुस्तक परीक्षण) / परीक्षित पुस्तक - 'माय फ्यूडल लॉर्ड' ले. तहमिना दुराणी, अनु- लीला आवटे, रूपाली पब्लिशर्स, मुंबई, प्रथमावृत्ती १९९३ / १५:३ पावसाळा १९९७ / ६७

तेलंग विजया / काही कन्नड उच्चारप्रवृत्ती / १५:३ पावसाळा १९९७ / ४४

दांडेकर गोपाळ नीळकंठ / सिद्धानुवाद - अनुभवामृत (पुनर्भेट) / १५:३ पावसाळा १९९७ / १०

देव विजया / भाषा आणि करमणूक (संपादकीय) / १५:१ हिवाळा १९९७ /१

देशपांडे गौरी / राजमा, कंगाल आणि गुल्बकावली (साद आणि प्रतिसाद क्र.१) / १५:४ दिवाळी १९९७ / ५१

• देशपांडे ब्रह्मानंद / मालखांड आणि ओथंबा (शब्दायन) / १५:३ पावसाळा

१९९७ / ५९
पाटील वसंत / कवींचे निरंकुशत्व (साद आणि प्रतिसाद) / १५:३ पावसाळा १९९७ / ३३
पांडे भारती / सूत्रसंचालन - एक टाळणे (जाता जाता) / १५:४ दिवाळी १९९७ / २५
पित्रे का.ग. / गनिमी कावा - काही समज व गैरसमज (अर्थायन) / १५:४ दिवाळी १९९७ / ४६
पुंडलीक शैलेश सदाशिव / एका विलक्षण भाषावैज्ञानिकाचे मुक्त (आणि बद्धसुद्धा) भाषाचिंतन (पुस्तक परीक्षण) / परीक्षित पुस्तक - मध्यमा, लेखक अशोक रा. केळकर, मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे ३०, १९९६ पृ. सं. २८२, मूल्य - १८२ रु. / १५:२ उन्हाळा १९९७ / ६४
पुंडलीक शैलेश सदाशिव / पाणिनीची मातृभाषा - काही उत्तरांचा शोध / १५:३ पावसाळा १९९७ / ४७
पुंडलीक शैलेश सदाशिव / रूपक आणि रूपितांग - अर्थांतरणाची प्रक्रिया / १५:४ दिवाळी १९९७ / ५
पुंडलीक शैलेश सदाशिव / संदिग्धतेचे प्रकार, कारणे आणि नि:संदिग्धीकरण / १५:१ हिवाळा १९९७ / ४
पोतदार दत्तो वामन / भाषा हाच प्रगतीचा पाया (पुनर्भेट) / १५:४ दिवाळी १९९७ / २९
बडवे नीती / प्रतिक्रियेवरची प्रतिक्रिया (साद आणि प्रतिसाद क्र. ४) / १५:४ दिवाळी १९९७ / ५७
भागवत वा.बा. / प्राचीन शिक्षणपद्धतीतील खाचखळगे / १५:३ पावसाळा १९९७ /५
भाटे सरोजा / भाषा राजनीतीची (ज्याची त्याची प्रचीती) / १५:२ उन्हाळा १९९७ / ६
मालशे मिलिंद स. / इंग्लिशमधील कोशवाङ्मय / १५:२ उन्हाळा १९९७ / ६
मालशे मिलिंद स. (अनुवादक) / भाषांतर (धन परक्याचे) मूळ रुमेनिअन कवी - मारिन सोरेस्कू (Marin Sorescu) इंग्रजी भाषांतरकार - टी. क्रिब / १५:३ पावसाळा १९९७ / ४६
मोडक ताराबाई / शिव्यागाळी (पुनर्भेट) / १५:२ उन्हाळा १९९७ / ३५

राईलकर मनोहर / आग रामेश्वरी बंब सोमेश्वरी / (साद आणि प्रतिसाद) / १५:२ उन्हाळा १९९७ / ६१

राईलकर मनोहर / तीन पायांची बाई (भाषायण) / १५:३ पावसाळा १९९७ / ५८

राईलकर मनोहर / नाविक हाल (एक प्रतिसाद) - (साद आणि प्रतिसाद क्र. ५) / १५:४ दिवाळी १९९७ / ५९

राईलकर मनोहर / वृत्तांच्या गणिती शक्यता (साद आणि प्रतिसाद क्र. ३) / १५:४ दिवाळी १९९७ / ५२

लोंढे लक्ष्मण / धर्मजीवन आणि मातृभाषा (दखलपात्र) / १५:४ दिवाळी १९९७/४१

शहा मृणालिनी / जातीची चिवट भाषा (संपादकीय) / १५:२ उन्हाळा १९९७/१

शेजाळ केशवराव / मराठी लिपीतील काही अक्षरांत व जोडाक्षरांत बदल (ज्याची त्याची प्रचीती) / १५:२ उन्हाळा १९९७ / ५८

सहस्रबुद्धे वर्षा / साहित्याशी मैत्रीच्या वाटेवर / १५:२ उन्हाळा १९९७ / ४३

सामंत सत्त्वशीला / उच्चारण -संकेत आणि लेखन - संकेत यांचा ताळमेळ / १५:२ उन्हाळा १९९७ / ५२

सार्वेकर कैलास / खानदेशातील बोली आणि बहिणाबाई चौधरींची काव्यभाषा / १५:२ उन्हाळा १९९७ /४५

क्षीरसागर हेमा / अभ्यासाचा एक वेगळाच पैलू (साद आणि प्रतिसाद) / १५:२ उन्हाळा १९९७ / ६२

क्षीर सुधा / डॉक्टर - रुग्ण संवाद ? १५:१ हिवाळा १९९७ / २७

## लेखन सूची

अनुवाद, की अनुवादाचे विडंबन ? (पुस्तक परीक्षण) / परीक्षण लेखक - विद्यागौरी टिळक / परीक्षित पुस्तक - 'माय फ्यूडल लॉर्ड' लेखक तहमिना दुराणी, अनुवाद लीला आवटे, रूपाली पब्लिशर्स, मुंबई प्रथमावृत्ती १९९३, पृ. सं. ४९२, मूल्य रु. १५०/- / १५:३ पावसाळा १९९७ / ६७.

अभ्यासाचा एक वेगळाच पैलू (साद आणि प्रतिसाद) हेमा क्षीरसागर / १५:२ उन्हाळा १९९७ / ६२
आग रामेश्वरी बंब सोमेश्वरी (साद आणि प्रतिसाद) / मनोहर राईलकर / १५:२ उन्हाळा १९९७ / ६१
इंग्लिशमधील कोशवाङ्मय / मिलिंद स. मालशे / १५:२ उन्हाळा १९९७ / ६
उच्चारण - संकेत आणि लेखन - संकेत यांचा ताळमेळ / सत्त्वशीला सामंत / १५:२ उन्हाळा १९९७ / ५२
एका विलक्षण भाषावैज्ञानिकाचे मुक्त (आणि बद्धसुद्धा) भाषा चिंतन (पुस्तक परीक्षण) / परीक्षित पुस्तक - मध्यमा, लेखक - अशोक रा. केळकर, मेहता पब्लिशिंग हाऊस पुणे, १९९६, पृष्ठे संख्या २८२, मूल्य - १८२ रु. / १५:२ उन्हाळा १९९७ / ६४
कवितेतील भाषाव्यवस्थेशी निगडित प्रतिमासृष्टी / नीलिमा गुंडी / १५:३ पावसाळा १९९७ / २७
कवींचे निरंकुशत्व : काही प्रतिक्रिया (साद आणि प्रतिसाद) / अशोक रा. केळकर / १५:३ पावसाळा १९९७ / ३७
कवींचे निरंकुशत्व (साद आणि प्रतिसाद) / वसंत पाटील / १५:३ पावसाळा १९९७ / ३३
कादंबरीकार (धन परक्याचे) अनुवाद - अशोक रा. केळकर / १५:१ हिवाळा १९९७ / ६०
काही कन्नड उच्चारप्रवृत्ती / विजया तेलंग / १५:३ पावसाळा १९९७ / ४४
खानदेशातील बोली आणि बहिणाबाई चौधरींची काव्यभाषा / १५:२ उन्हाळा १९९७ / ४५
गनिमी कावा - काही समज व गैरसमज (अर्थायन) / का. ग. पित्रे / १५:४ दिवाळी १९९७ / ४६
जातीची चिवट भाषा (संपादकीय) / १५:२ उन्हाळा १९९७ / १
डॉक्टर - रुग्ण संवाद / सुधा क्षीरे / १५:१ हिवाळा १९९७ / २
तीन पायांची बाई (भाषायण) / मनोहर राईलकर / १५:३ पावसाळा १९९७ / ५८

धर्मजीवन आणि मातृभाषा (दखलपात्र) / लक्ष्मण लोंढे / १५:४ दिवाळी १९९७ / ४१
नाविक हाल (एक प्रतिसाद) (साद आणि प्रतिसाद क्र. ५) / मनोहर राईलकर / १५:४ दिवाळी १९९७ / ५९
पत्रिकेबद्दल वार्षिक निवेदन (सूचनाफलक ) १५:१ हिवाळा १९९७ / ७२
पाणिनीची मातृभाषा काही उत्तरांचा शोध / शैलेश सदाशिव पुंडलीक / १५:३ पावसाळा १९९७ / ४७
प्रतिक्रियेवरची प्रतिक्रिया (साद आणि प्रतिसाद क्र. ४) / नीती बडवे / १५:४ दिवाळी १९९७ / ५७
प्राचीन शिक्षण पध्दतीतील खाचखळगे / वा.बा. भागवत / १५:३ पावसाळा १९९७ / ५
भाषा आणि करमणूक (संपादकीय) / विजया देव / १५:१ हिवाळा १९९७ /१
भाषा राजनीतीची (ज्याची त्याची प्रचीती) / सरोजा भाटे / १५:२ उन्हाळा १९९७ / ५७
भाषा हाच प्रगतीचा पाया (पुनर्भेट) / दत्तो वामन पोतदार / १५:४ दिवाळी १९९७ / २९
भाषांतर (धन परक्याचे) / मिलिंद मालशे (अनुवादक) / मूळ रुमेनिअन कवी Marin Sorescu, इंग्रजी भाषांतरकार - टी. क्रिब / १५:३ पावसाळा १९९७ / ४६
भुसावळ (ज्याची त्याची प्रचीती) / द.भि. कुलकर्णी / १५:१ हिवाळा १९९७ / ६३
मधाच्या घागरीच्या निमित्ताने / लीला अर्जुनवाडकर / १५:४ दिवाळी १९९७ / ३५
मराठी अभ्यास परिषद आणि 'भाषा आणि जीवन' पत्रिका : एक स्थित्यंतर (सूचनाफलक) / १५:४ दिवाळी १९९७ / ८१
मराठी इंग्रजी संयुक्त पेपर (साद आणि प्रतिसाद) शर्मिष्ठा खेर / १५:३ पावसाळा १९९७ / ४०
मराठीतील भाषाविषयक लेखन : १९९६ / १५:१ हिवाळा १९९७ / ६७
मराठी लिपीतील काही अक्षरांत व जोडाक्षरांत बदल (ज्याची त्याची प्रचीती)

केशवराव शेजाळ १५:२ उन्हाळा १९९७ / ५८
'मऱ्हाटी संस्कृती : काही समस्या' एक वाटचाल / वसंत स. जोशी / १५:१ हिवाळा १९९७ / ३५
मालखांड आणि ओथंबा (शब्दायन) / ब्रह्मानंद देशपांडे / १५:३ पावसाळा १९९७ / ६३
राजमा म्हणजे श्रावणघेवडा (साद आणि प्रतिसाद क्र. २) / १५:४ दिवाळी १९९७ /५१
राजमा, कंगाल आणि गुलबकावली (प्रतिसाद क्र.१) / गौरी देशपांडे / १५:४ दिवाळी १९९७ / ५१
रूपक आणि रूपितांग : अर्थांतरणाची प्रक्रिया / शैलेश सदाशिव पुंडलीक / १५:४ दिवाळी १९९७ / ५
लिहायचं तरी कशासाठी ? (संपादकीय) / अशोक रा. केळकर १५:४ दिवाळी १९९७ /१
लेखन (धन परक्याचे) / मूळ लेखक - विस्टॅन ह्यू ऑडन, अनुवादक - नीलिमा गुंडी / १५:१ हिवाळा १९९७ / ४६
लेणे की लेणी ? (साद आणि प्रतिसाद) / लीला अर्जुनवाडकर / १५:१ हिवाळा १९९७ / ६५
वर्ष १५, १९९७ ची लेखनसूची (पत्रिकासूची) / १५:४ दिवाळी १९९७ / ७४
वाढता वाढता वाढे / नीलिमा गुंडी /१५:४ दिवाळी १९९७ / ४४
वृत्तांच्या गणिती शक्यता (साद आणि प्रतिसाद क्र.३) / मनोहर राईलकर / १५:४ दिवाळी १९९७ / ५२.
वेद आणि मुठीत ? / माधवी कोल्हटकर / १५:३ पावसाळा १९९७ / ४१
शास्त्रीय लेखनातील शैथिल्य (पुस्तकपरीक्षण) / मा. ना. आचार्य / परीक्षित पुस्तक - मराठी व्याकरण, लेखक - लीला गोविलकर, मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे ३०, प्र.आ. १९९३. मूल्य १०० रु. / १५:४ दिवाळी १९९७ / ६१
शिव्यागाळी (पुनर्भेट) / ताराबाई मोडक / १५:२ उन्हाळा १९९७ / ३५.
संत ज्ञानेश्वरांचा अमृतानुभव : विंदा करंदीकरांची प्रतिक्रिया (पुनर्भेट) / विंदा

करंदीकर / १५:३ पावसाळा १९९५ / १८
संदिग्धतेचे प्रकार, कारणे आणि नि:संदिग्धीकरण / शैलेश सदाशिव पुंडलीक / १५:१ हिवाळा १९९७ ।४
साजिंदा व बाजिंदा (शब्दायन) / श्रीपाद जोशी / १५:१ हिवाळा १९९७ / ६१
साहित्याशी मैत्रीच्या वाटेवर / वर्षा सहस्रबुद्धे / १५:२ उन्हाळा १९९७ ।४३
सिद्धानुवाद - अनुभवामृत (पुनर्भेट) / गोपाळ नीळकंठ दांडेकर / १५:३ पावसाळा १९९७ / १०
सूत्रसंचालन :एक टाळणे (जाता जाता) / भारती पांडे / १५:४ दिवाळी १९९७ ।२५

□

---

नृत्यांगना रोहिणी भाटे यांच्या 'नृत्यभारती' संस्थेचा सुवर्णमहोत्सव-सांगता-समारंभ १० जुलै १९९७ रोजी टिळक स्मारक मंदिरात झाला. त्यात रोहिणीताईंच्या नृत्यपरिवारातील तीन पिढ्यांनी वेगवेगळे कार्यक्रम सादर केले. एका नृत्याविष्कारानंतर दुसरा कार्यक्रम सादर होण्यापूर्वी पडदा न पाडता रंगमंचावर अंधार केला जात होता. पहिलीतून दुसरीत पाय ठेवलेल्या गौरीने विचारले,

"आत्या, हा मधेच अंधार का करतात?"

"अग पहिला कार्यक्रम संपला, यानंतर पुढचा कार्यक्रम होणार हे समजावं म्हणून अंधार करतात." आत्या.

"म्हणजे एक वाक्य संपल्यावर दुसरं वाक्य लिहिण्यापूर्वी आपण पूर्णविराम देतो तसं ?"

पूर्णविराम ही एक अमूर्त संकल्पना तितक्याच अमूर्त घटनेसाठी इतकी अचूक वापरता येणे, तेही सहाव्या वर्षी; हे फक्त स्वभाषेत शक्य आहे. चि. गौरी मराठी माध्यमाच्या शाळेत शिकते.

□

प्रेषक - सुमन बेलवलकर





अनुक्रमणिका

# मराठी अभ्यास परिषद आणि 'भाषा आणि जीवन' पत्रिका : एक स्थित्यंतर

मराठी अभ्यास परिषद १९८२ साली अस्थायी स्वरूपात स्थापन झाली आणि १९९५ साली तिची रीतसर नोंदणी करण्यात येऊन ती कायदेशीर स्वरूपात अस्तित्वात आली. (संस्था नोंदणी क्रमांक महा/१०७२१-९५/पुणे, न्यास नोंदणी क्रमांक एफ्. ११४५८/पुणे) इकडे परिषदेने १९८३ साली 'मराठी अभ्यास परिषद पत्रिका : भाषा आणि जीवन' सुरू केली आणि पत्रिकेची वृत्तपत्र निबंधक, भारत सरकार, नयी दिल्ली यांच्याकडे नोंदणी करण्यात आली. (नोंदणी क्रमांक ०४००४८/८३). या नवीन परिस्थितीची १०:०९:१९९७ रोजी परिषदेच्या कार्यकारिणीमध्ये विस्ताराने चर्चा झाली आणि २१:०९:१९९७ रोजी झालेल्या संस्थेच्या साधारण सभेत अध्यक्षांनी मांडलेल्या ठरावानुसार एक नवीन व्यवस्था संमत करण्यात आली.

नवीन व्यवस्था करताना काही गोष्टी लक्षात घेतल्या आहेत : (क) १९९१ पासून परिषदेचे आजीव सभासद नोंदण्याचे बंद केले होते, मात्र पत्रिकेचे आजीव वर्गणीदार नोंदणे चालू ठेवले होते. (ख) गेल्या काही वर्षांत कागद, छपाई, पोस्टेज यांची अतोनात महागाई झाली आहे आणि यापुढे ती वाढत राहील असे दिसते. त्यामुळे पत्रिकेसाठी आजीव वर्गणी स्वीकारण्याचेही १९९८ पासून बंद करावे लागणार आहे. (ग) आपण केवळ परिषदेचे सभासद व्हायचे किंवा पत्रिकेचे वर्गणीदार व्हायचे किंवा दोन्ही व्हायचे याचा स्पष्ट निर्णय यापुढे ज्याला त्याला करायचा आहे. पण आतापर्यंत झालेले सभासद आणि वर्गणीदार यांच्या संबंधात संक्रमणकाळासाठी विशेष तरतुदी करणे योग्य होईल. (घ) परिषदेचे पत्रिका प्रकाशनाखेरीज इतरही उपक्रम असतात, उदाहरणार्थ, महाबँक मराठी भाषाविषयक लेखन पारितोषिक प्रतिवर्षी द्यायचे, चर्चासत्रे घडवायची इत्यादी.

पैशाच्या अडचणीमुळे आजकाल मराठीमधील वैचारिक स्वरूपाची नियतकालिके बंद पडत आहेत. आपल्यापुढील प्रश्नाचे गांभीर्य सांगायला नको. परिस्थितीमधून काही मध्यम मार्ग काढावा या बुद्धीने प्रस्तुत संक्रमणकालीन तरतुदी करण्यात आल्या आहेत त्या संबंधितांनी लक्षात घ्याव्या आणि आवश्यक सहकार्य करावे ही विनंती.

१) संस्थेची रीतसर नोंदणी १९९५ साली झाली आणि संस्थेची नवीन व्यवस्था ०१:०१:१९९८ पासून अमलात येत आहे.

२) १९९८ पासून परिषदेचे सभासदत्व आणि पत्रिकेचा वर्गणीदार असणे याची फारकत करण्यात येत आहे. ज्यांना १९९८ पासून परिषदेचे नव्याने सभासद व्हायचे आहे त्यांनी सभासदत्वाचे वार्षिक शुल्क रु. १०० किंवा यापुढे वेळोवेळी ठरेल ती रक्कम भरावी. त्यांना घटनेनुसार मिळणारे केवळ सभासदत्वाचे हक्क असतील. त्यांना पत्रिका हवी असेल तर वेळोवेळी लागू असणाऱ्या दराप्रमाणे त्यांना पत्रिकेची वर्गणी वेगळी भरावी लागेल. ज्यांना केवळ पत्रिकेची वर्गणी भरायची आहे ती त्यांनी वेळोवेळी लागू असणाऱ्या दराप्रमाणे भरावी. अशा वर्गणीदारांना परिषदेचे सभासद समजण्यात येणार नाही आणि घटनेप्रमाणे मिळणारे सभासदत्वाचे हक्क असणार नाहीत. पत्रिकेची आजीव वर्गणी स्वीकारण्याची पद्धत यापुढे बंद करण्यात येत आहे.

३) संस्थेची स्थापना १९८२ साली झाली आणि १९९० पर्यंत संस्थेच्या आजीव सभासदांची नोंदणी करण्यात आलेली आहे. या काळात संस्थेचे जे आजीव सभासद झाले आहेत त्यांना नोंदणीकृत परिषदेचे आजीव सभासद मानण्यात येईल. मात्र त्यांची सभासदसूचीत नोंद व्हावी यासाठी ३१:१२:१९९७ पर्यंत विहित नमुन्याप्रमाणे आवेदनपत्र भरून तांत्रिक पूर्तता करणे आवश्यक आहे. ह्या सभासदांनी त्यावेळी भरलेले आजीव सभासद शुल्क रु. २०० किंवा रु. ४०० आणि सध्याची आजीव वर्गणी रु. ६०० यातील फरक देणगी म्हणून द्यावा असे त्यांना नैतिक आवाहन करण्यात येत आहे. (नाहीपेक्षा पत्रिका पाठवीत राहण्यासाठी संस्थेला पडणारी वार्षिक धस वाढत जाईल हे लक्षात घ्यावे.)

४) १९९१ ते १९९७ या काळात 'मराठी अभ्यास परिषद पत्रिके' ची आजीव वर्गणी म्हणून रु. ४०० किंवा रु. ६०० भरणाऱ्यांच्या बाबतीत पुढील तरतुदी लागू करण्यात येत आहेत.

अ) त्यांच्यापैकी ज्यांना नोंदणीकृत परिषदेचे आजीव सभासद होण्याची इच्छा असेल त्यांना ३१:१२:१९९७ पर्यंत रीतसर आवेदनपत्र भरून संस्थेचे आजीव सभासद व्हावे लागेल. मात्र त्यांच्यापैकी ज्यांनी रु. ४०० आजीव वर्गणी म्हणून भरले आहेत त्यांनी आवेदनपत्रासोबत रु. २०० भरणे आवश्यक आहे. ज्यांनी

अगोदरच रु. ६०० भरलेले आहेत त्यांनी फक्त आवेदनपत्र भरणे आवश्यक आहे.

आ) परिच्छेद 'अ' मधील तरतुदीनुसार जे पत्रिकेचे आजीव वर्गणीदार नोंदणीकृत संस्थेचे नव्याने आजीव सभासद होतील त्यांनाच घटनेप्रमाणे मिळणारे आजीव सभासदत्वाचे हक्क मिळतील. नाहीपेक्षा ते सध्या आहेत त्याप्रमाणे केवळ पत्रिकेचे आजीव वर्गणीदार राहतील.

५) १९९५ साली जे मराठी अभ्यास परिषदेचे वार्षिक वर्गणीदार झाले आणि अजूनही आहेत त्यांना आणि १९९६ व १९९७ साली जे लोक पुण्यातून पत्रिकेचे वार्षिक वर्गणीदार झालेले आहेत त्यांना साधारण सभेसाठी निमंत्रित करण्यात आले होते. जरी १९९१ पासून परिषदेची आजीव सभासद नोंदणी थांबवण्यात आली होती तरी संक्रमणकाळातील विशेष तरतूद म्हणून त्यांना ३१:१२:१९९७ पर्यंत नोंदणीकृत संस्थेचे आजीव सभासद होऊन जाण्याची संधी देण्यात येत आहे. त्यासाठी त्यांनी ३१:१२:१९९७ पर्यंत आवेदनपत्र आणि रु. ६०० आजीव सभासद शुल्क भरायचे आहे.

६) वरील तरतुदींनुसार ३१:१२:१९९७ पर्यंत जे नोंदणीकृत संस्थेचे आजीव सभासद ठरतील किंवा होतील त्यांना 'मराठी अभ्यास परिषद पत्रिके' ची वेगळी वर्गणी भरावी लागणार नाही.

□ ■

---

## गुलाबा कुल्ता

तीन वर्षांच्या छोट्या ईश्वरीला तिच्या आईनं नवा पोशाख आणला - सलवार आणि कुर्ता. दोन्ही गुलाबी होते. हा पोशाख तिला खूप आवडला. ती सगळ्यांना सांगत सुटली. 'ही बघ माझी गुलाबी सलवाल. हा माझा गुलाबा कुल्ता.'

**ा भरण्याबद्दल सूचना :**

पैसे रोख दिल्यास आठवणीने पावती घ्यावी. चेक 'मराठी अभ्यास परिषद' नावाने काढावा. मनिऑर्डरकूपनवर किंवा चेकसोबतच्या चिठ्ठीवर पैसे पाठवणाराचे ा, पत्ता, रक्कम आणि ती कशा पोटी पाठवली. ते अवश्य लिहावे. नमुना अंक ठाला असल्यास कोणता मिळाला, याचा उल्लेख करावा. चेक बँकेच्या पुण्याबाहेरच्या खेचा असल्यास रकमेत ५ रुपये वटणावळ भर घालावी. पावती मागाहून पाठविली ईल.

**त्रिकेची वर्गणी :**

पत्रिकेची वार्षिक वर्गणी भरताना पत्रिकेचे वर्ष जानेवारी ते डिसेंबर असेच ोल हे लक्षात घ्यावे. पत्रिकेचे वर्षात चार अंक निघतात मात्र १९८३ मध्ये केवळ ाच अंक निघाले आहेत. पत्रिकेचे चालू वर्षाव्यतिरिक्तचे अंक हवे असल्यास ठूशकतील. वर्गणीची आकारणी पुढीलप्रमाणे करण्यात येते :

चालू वर्गणी परिषदेच्या सामान्य समासदांसाठी (सभासद वर्गणी धरून) वर्षाला ६० रु.

चालू वर्गणी संस्था आणि सभासद नसलेल्या व्यक्ती यासाठी वर्षाला ७५ रु.

सुट्या अंकाला (मग तो चालू वर्षाचा असो, की मागील वर्षापैकी असो) २० रु.

परदेशातील व्यक्तींसाठी वर्षाला १५ डॉलर.

परदेशातील संस्थांसाठी वर्षाला २० डॉलर.

सुटा अंक परदेशी पाठवायचा झाल्यास त्याची किंमत ६ डॉलर इतकी पडेल.

**ाषदेची वर्गणी :**

मान्य सभासदांची वार्षिक वर्गणी वर दिलीच आहे. एका घरात एकापेक्षा अधिक मान्य सभासद असले आणि त्यापैकी एकाच्याच नावावर पत्रिकेचा अंक हवा सला तर इतर सभासदांनी केवळ ३० रु. भरायचे आहेत. उदाहरणार्थ : एका ात दोन सभासद आणि एक अंक अशी स्थिती असल्यास वर्षाला ६० रु. + रु. असे एकूण ९० रु. भरावे लागतील.

**हिरातीसाठी दर :**

पान ७५० रु., अर्धे पान ४०० रु., पाव पान २५० रु., शुभेच्छा सूचना १०० आवरण पृष्ठ चार १००० रु., आवरण पृष्ठ दोन/तीन ८०० रु. जाहिरात हिंदीत इंग्रजीत असल्यास चालेल, मराठीत असल्यास उत्तम.

नोंदणी क्रमांक : ०-४००४८/८३

## ★ आपण मराठी-अभ्यास-परिषदेसाठी काय करणार ?

- सभासद नसाल, तर प्रथम स्वत: सभासद व्हा.
- सभासद असाल, तर देणगीदार / आश्रयदाते सभासद आणि साधारण सभासद मिळवून द्या.
- परिषदेसाठी काही नियमित वेळ देऊ शकत असाल तर चिटणिसांशी संपर्क साधा.
- परिषदेचे सर्व कार्यकर्ते आपले नित्याचे काम सांभाळून परिषदेची कामे करीत असल्यामुळे एकाच्या जागी चार कार्यकर्ते लागतात.
- परिषदेने प्रकाशित केलेल्या पुस्तकांच्या विक्रीसाठी साहाय्य करा.
- परिषदेचे काम वाढविण्यासाठी नवनव्या कल्पना सुचवा.

## ★ आपण पत्रिकेसाठी काय करू शकता ?

- लेखन पाठवा.
- परभाषांतून अनुवाद करा.
- ग्रंथपरीक्षणे लिहा.
- 'पुनर्भेट' किंवा 'वाघिणीचे दूध' या सदरास योग्य अशा मराठी किंवा अन्य भाषेतील मजकुरांबद्दल सूचना पाठवा.
- भाषेसंबंधी वार्ता, भाषादोषांची उदाहरणे, चांगल्या भाषेची उदाहरणे, इत्यादींशी संबंधित वृत्तपत्रीय किंवा इतर कात्रणे पाठवा.
- पत्रिकेत भाषाव्यवहाराशी संबंधित हास्यचित्रे द्यायची कल्पना कशी वाटते ?
- जाहिरात मिळवून द्या.
- संस्था-वर्गणीदार मिळवून द्या.

**★ संपर्क ★**

**मराठी अभ्यास परिषद**

१, शीतल अपार्टमेंट, ४६/४, एरंडवणे, पुणे ४११ ००४.

दूरध्वनी : ३३ ३८ ६९